# शांतिकुंज

## निबंध

## परवरण



लेखिका

**शांता नाशिककर,** बी. ए.



प्रस्तावना—लेखक

राजरत्न **वा. वि. जोशी,** बी. ए., एल्‌एल्. बी.




प्रकाशक

नारायण लक्ष्मण कोकाटे, २०० सदाशिव पेठ, पुणें २.

मुद्रक:

लक्ष्मण भाऊराव कोकाटे, हनुमान प्रेस, २०० सदाशिव पेठ, पुणें २.

एप्रिल १९४० ] [ किंमत १ रु.

# प्रस्तावना

सुप्रसिद्ध लेखिका **सौ. शांताबाई नाशिककर** बी. ए. ह्यांच्या निर-निराळ्या विषयांवरील लेखांचा संग्रह 'शांतिकुंजांत' केलेला आहे. **सौ. शांताबाई** ह्या कादंबरीकार म्हणून मराठी साहित्यांत प्रसिद्ध आहेत. "लग्नाचा बाजार," "साम्राज्यासाठीं," "हाच कां धर्म ?" "कौमुदी," "चिखलांतलें कमळ," "माझी कोरीव लेणीं," (चालू "स्त्री" मध्यें क्रमशः) ह्या त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या आजवरच्या सहा कादंबऱ्या घेतल्या तरी प्रसिद्धीच्या दृष्टीनें पाहिलें, तर "लग्नाचा बाजार" ह्या त्यांच्या पहिल्याच कादंबरीनें त्यांना पुढें आणलें. त्याचें बरेंचसें श्रेय प्रतिपाद्य विषय आणि प्रतिपादनशैली ह्याच्याकडेच जातें. एका जिव्हाळयाच्या प्रश्नावर एका स्त्री लेखिकेनें अगदीं सडेतोडपणें आणि लढाऊ वृत्तीनें लिहिलेली ही कादंबरी पुष्कळ वर्षे चर्चेचा एक विषय होऊन राहिली होती. "हाच कां धर्म ?" ह्याहि तितक्याच सरस कादंबरीनें दुसऱ्याच एका सामाजिक प्रश्नास हात घातला. ह्या दोन्ही कादंबऱ्या विशेषेंकरून प्रक्षोभक झाल्या, त्या निर्बुद्ध रूढींना बुद्धिवादाच्या भूमिकेवरून लेखिकेनें केलेल्या आव्हानांमुळें आणि आघातांमुळें होय. त्यानंतर कादंबरीक्षेत्रांतील मूल्यें, कविसंकेत, दृष्टिकोन, विषय, हीं सर्वच पार बदलून गेलीं, त्यामुळें लेखिकेची विशिष्ट लेखनपद्धति "चिखलांतलें कमल" या कादंबरींत जरी तीच कायम राहिली असली, तरी ह्या कादंबरीचा व्हावा तितकासा बोलबाला झाला नाहीं. "माझीं कोरीव लेणी" या आत्मवृत्तपर कथेंत जुन्या परंपरा आणि विधि-निषेध ह्यांच्या दडपणाखालीं आधुनिक आचारविचारांची जोपासना मघल्या पिढीला किती सोशीकपणानें करावी लागली ह्याचे शिलालेख शांताबाईच्या "कोरीव लेण्यांत" पावलागणिक मांडलेले दिसतात. लढाऊपणें रूढींवर हत्यार चालवून त्यांना नेस्तनाबूद करूं इच्छिणाऱ्या लेखणीनें शेवटीं रूढींनीं, मानसिक कुचंबणेची निर्माण केलेली न्यूनगंडें छेदून त्यांतून भावनांचे पाट वहावयास लावावेत, असाच प्रकार 'लग्नाचा बाजार' आणि 'कोरीव लेणी' ह्या पहिल्या आणि शेवटच्या कादंबऱ्यांचा झालेला दिसतो. आणि हीच सोशीकपणाच्या पोटीं वाढविलेली आत्मनिरीक्षणप्रवृत्ति थोडया फार प्रमाणांत प्रस्तुतच्या लेखांत

दिसून येते. ऐतिहासिक कादंबऱ्यांना अनुकूल काल आतां उरला नसल्यानेंच केवळ त्यांच्या " साम्राज्यासाठी " आणि " कौमुदी " ह्या दोन्ही कादंबऱ्यांची तितकीशी बोलबाला होऊं शकली नाहीं. हरीभाऊंच्या काळांत ह्या सर्व कादंबऱ्या यथाक्रम प्रसिद्ध होत्या तर कदाचित् ऐतिहासिक कादंबऱ्यांमुळेंच त्यांना प्रसिद्धी जास्त लाभती आणि सामाजिक कादंबऱ्यांचा अनुक्रम खालींहि लागला असता. कालाची अनुकूलता कादंबरीइतकी दुसऱ्या कोणत्याच वाङ्मयनिर्मितीला आणि प्रसिद्धीला लागत नसावी.

लेखिकेच्या मनोभूमिकेची थारेपालट जी कादंबऱ्यांतून उत्तरोत्तर होत गेलेली दिसते, तिचा परिपाकच जणूं ह्या निबंधांतून प्रत्ययाला येतो. मानवी मन हें गूढ खरेंच; परंतु पुरुषी मनाचें मनोविश्लेषण आज शेंकडों वर्षे इतक्या विपुलतेनें आणि विविधतेनें होऊन गेलें आहे कीं, पुरुषाच्या सुष्टदुष्ट मनोरचनांचें चित्रीकरण सर्वतोप्रकारें येऊन गेलें आहे. पुरुषांनी केलेलें स्त्रियांसंबंधीचें लिखाण, अपुरें आणि असत्य असण्याचा संभव असतांनाहि अजूनहि प्रमाणभूत धरण्याकडे वाचकाचा कल असतो, याला जबाबदार स्त्रीलेखकांची अल्पसंख्या असली तरी खुद्द स्त्रीलेखकांचा संकोच शेवटीं जबाबदार आहे. सध्यांचें वाङ्मय प्राधान्येंकरून मनोविश्लेषणात्मक असल्यानें स्त्रीमनाचें गूढ स्वतः स्त्रीलेखिकांनीच निःसंकोचपणें उकलून दाखवावें अशी वाचकांची मुख्य अपेक्षा असते. लेखनाचा हेतू आणि प्रकार, ह्यादृष्टीनें स्त्रीलेखिकांचे दोन गट आढळून येतात. एक चढाईखोर पुरुषी थाटाचा; आणि दुसरा सहनशील विचारवंतांचा. पुरुषी थाटाच्या लेखिका पुरुषी भाषा बोलतील लिहितील, रूढीवर प्रखर हल्ले चढवितील, वरेरकरी नायिकेप्रमाणें पुरुषांनाच सर्वांबद्दल जबाबदार धरून त्यांच्या डोक्यावर चपलप्रहार करतील, इतकेंच नव्हे तर मनोविश्लेषणाच्या ईर्षेला चढून उत्तान आणि विकृत स्वभावचित्रें रंगवितील. परंतु ह्या गटास एकंदर स्त्रीसमाजाचा प्रतिनिधी म्हणून मानतां यावयाचा नाहीं. दुसरा गट सर्व सामाजिक अन्यायांचे जुलूम अगतिकांच्या सहनशीलतेनें सहन करील, रूढींच्या ऐवजीं रूढांना हट्टानें चिकटून राहणाऱ्या समाजाला व वेळीं स्वतःलाच दोष लावील, आधुनिक विचारानीं भयभीत होऊन जुन्या परंपरेकडे धावेल आणि चालीरितींच्या स्वप्नींहि नसलेलीं नैतिक मूल्यें शोधून काढून नव्याजुन्यांच्या दरडींना जोडणारा सुवर्णमध्यमांचा पूल बांधण्याची खटपट करील. स्त्रीसमाजाची आजची मनोरचना, अज्ञान

परवशता, लक्षांत घेतली तर दुसरा गट हाच जवळ जवळ त्यांचे खरेखुरें विचार बोलून दाखवितो असें म्हणावे लागेल. सौ. शांताबाईचे प्रस्तुतचे निबंध पाहिले तर त्यांना ह्या दुसऱ्या गटांत मोजावें लागेल. ‘ नेमधर्म ’ हाच लेख घ्या. तांत्रिक धर्माचरणाच्या तावडींत सांपडलेल्यांनीं व्रतवैकल्यें, नेमधर्म, प्रसृत केले, आणि ईप्सितांच्या लोभांनीं बहुजनसमाजानें अंगिकारले, पण लेखिकेनें मनोनिग्रह, आत्मविकास, आरोग्यवर्धन, शिस्त, काटकपणा हीं साधण्यासाठीं नेमधर्म प्रत्येकानें अवश्य पाळावेत असें सांगून, प्रदक्षिणा घालणें, नक्त करणें इत्यादि नियमधर्मांची तरफदारी केली आहे. पण पुढें त्या लिहितात ‘ पण असले नियम सुशिक्षित बायका करूं लागल्या तर मात्र तें हास्यास्पद ठरेल. ’ ( पृष्ठ ५३ ) “ सुशिक्षितांनीं जुन्या नियमांत साष्टांग नमस्कार, प्राणायाम, आसनें, वाचन, ज्ञानदान करणें–समाजसेवा करणें–असल्या नियमांची भर टाकावी. ” ( पृष्ठ ५७ ) धार्मिक संस्कारांचा पगडा स्त्रियांच्या मनावर विशेष असतो आणि तीच स्थिति लेखिकेचीहि दिसून येते. स्त्रीशिक्षणविषयक योजनेंत ‘ धर्मविधींकडेहि अवश्य लक्ष द्यावें. हल्लींच्या रूढ विधींना विचारपूर्वक वेगळें वळण देणें अवश्य आहे. ” ( पृ. २९ ) असें त्यांनीं सुचविलें आहे. एकंदरींत भावनांनी लेखिका ही खात्रीनें एकंदर स्त्रीसमाजाची अधिकृत प्रतिनिधी गणली जाण्यास पात्र आहे.

लेखिकेच्या भावना जुन्या वळणाच्या असल्या तरी विचार आधुनिक आहेत आणि नवे विचार रूढ भावना न दुखतील अशा शब्दांनी मांडण्यांत त्यांनीं दाखविलेला लेखनसंयम प्रशंसनीय आहे खास. वरचढपणाबद्दल कुणाहि सुशिक्षित स्त्रीनें पुरुषांचे शेलक्या शब्दांनी वाभाडे काढले असते, आणि वेळीं चांभारपूजाहि बांधली असती; तोच भाव, तीच चीड लेखिकेनें मोठ्या समर्पकतेनें आणि विनयानें व्यक्त केलीं आहेत. “ प्रत्येक वेळेला स्त्रीलाच नमवावयाचें यांत यत्किंचित् सुद्धां पुरुषार्थ नाहीं; बळी तो कान पिळी हें रानटी तत्त्वच त्यांत आहे ” ( पृ. ७४ ) “ स्त्रीच्या कामाचें कौतुक पतीनें केलें नाहीं तर दुसरें कोण करणार ? ” ( पृ. ७६ ). जुन्या भावना नवीन विचारांच्या आंखणीत आणि उजळा देऊन मांडावयाच्या, आणि नव्या भावना चालू परंपरेच्या पोटांत अलगद भरावयाच्या, अशी लेखिकेची प्रमूख भूमिका दिसते. एकत्र कुटुंबपद्धतींतहि त्यांना चांगल्या घटना दिसतात, वाईट घटना दुरुस्त करण्याची

शक्यता वाटते आणि त्याचबरोबर विभक्त कुटुंबांतील गुणहि त्या कबूल करतात. असे विचार सकृद्दर्शनी घरसोडीचे दिसतीलहि. परंतु नव्या जुन्यांची सांगड घालून दोघांनाहि कालौघाबरोबर लोटीत न्यावयाचें असें व्यापक ध्येय त्यांच्या पुढें त्यांनीं ठेवलेलें दिसतें. " स्त्रियांचें काम घरांतल्या घरांत असतें, दिवसभर राबलें तरी सांगतां येत नाहीं, त्यांना कामाचा मोबदलाहि मिळत नाही म्हणून तें विनामूल्य समजलें जातें." (पृ.७६) " पत्नीचें तारुण्य नेहमीं टिकून राहावें असें जर प्रत्येक पतीला वाटत असेल, तर तिच्या करमणुकीसाठी पतीनें एपतीप्रमाणें तयार असलें पाहिजे; नाहीतर घरांतील एकसुरी कामकाजामुळें तिचें पूर्वीचें उल्हसित मन उदासीन होऊन ती पोक्त बनली तर त्याचा दोष कोणाकडे ?" (पृ. ७७) असे हे विचार ह्याच नव्या जुन्या अशा भिन्न मनोरचनेचे द्योतक आहेत.

ही लेखिकेची भूमिका लक्षांत घेऊन पुस्तक वाचूं लागले म्हणजे स्पष्टार्थापेक्षां गूढार्थाची ओळख पटते. तरी त्यांच्या लेखांत मनोविश्लेषण पुष्कळ ठिकाणीं अगदीं स्पष्ट शब्दांतहि सांपडेल. ह्या दृष्टीनें संसारचित्र हा लेख मार्मिक आहे खास. ' कित्येक संसार पहावे तेव्हां एकादाच संसार सर्व बाजूंनी रम्य दिसतो ' असें बजावून संसारचित्रें विफल करणाऱ्या बऱ्याच घटना त्यांनी नमूद केल्या आहेत. " वधूवरांच्या वयांत दहाबारा वर्षांपेक्षां जास्त फरक असणें वाईट. वयोमानानें शरीर आणि मन यांत जे फेरबदल होत जातात, ते दोघांचे सारख्या प्रमाणांत झाले तर ठीक. नाहीतर बायको ऐन उमेदींत आणि नवरा उतार वयाचा ! म्हणजे त्यांचे जमावयाचें कसें ?" (पृ. ७०) ' पत्नीनें गबाळपणा दाखवला की स्वारी रागावलीच ! पण रसिकपणाच्या भावना पतीलाच तेवढ्या असतात आणि पत्नीला नसतात असें आहे कां ? बाहेर जातांना अगदीं सूट, नेकटाय–कॉलर घालून शृंगार करावयाचा आणि घरीं आल्यावर पंचा किंवा अंगाच्या घाटाला शोभत नसली तरी पांकळ विजार किंवा चड्डी घालायची, अंगांत कांहींच घालायचें नाहीं किंवा अर्ध्या बाह्यांचा सदरा घालावयाचा ! त्यामुळें छातीवरलें व पुढच्या हातावरलें केसांचें किळसवाणें दृश्य दिसत असतें. डोकीचे केस विसकटलेले, घामधुळीनें मळलेला चेहेरा आणि सिगारेटच्या वासानें युक्त असें तोंड, ह्या सर्व गोष्टींचा बायकांना कंटाळा

वाटत नाहीं अशी कां पुरुषांची समजूत आहे ? ... पुरुषांपेक्षां स्त्रियांचें मन हळुवार असतें, त्यांच्या भावना अधिच कोमल असतात, त्यांची रसिकता फार नाजूक स्वरुपाची असते, यासाठीं पुरुषांनीं फार जपलें पाहिजे ' ( पृ. ७७ ) 'पतिपत्नींना सामाजिक आयुष्य जरूर असतें. एकमेकांत गुरफटून त्यांचें आयुष्य कंटाळवाणें होईल ' ( पृ. ७९ ) ' परस्परांविषयीं दृढ श्रद्धा आणि विश्वास ठेवणें हें दोघांच्याहि मनस्वास्थ्याला जरूरीचे असतें. येवढया तेवढया गोष्टींवरून संशय धरून स्वतःचें मन पोखरल्यासारखें करावयाचें आणि मग मनाची खात्री करून घेण्यासाठीं एकमेकांवर टेहळणी करावयाची, नोकरांना एकमेकांच्या पाळतीवर ठेवावयाचें किंवा एकमेकांना खोदून खोदून कुचकेनासके प्रश्न विचारावयाचे आणि रागवारागवी, चिडाचीड झाली कीं, मित्रमंडळीजवळ रडूनकढून गृहच्छिद्रें सांगत सुटावयाचें आणि निंदा करायची, यासारखी अजाणपणाची आणि आत्मघातकीपणाची दुसरी गोष्ट नाहीं. ' ( पृ. ७९ ) सूक्ष्म निरीक्षण, मार्मिक सूचना, संयम आणि समतोलपणा, ह्या सर्वांचा सुंदर मिलाफ ' संसारचित्र ' ह्या लेखांत सांपडेल. हा लेख मात्र अपुरा वाटतो. स्त्रीपुरुषविषयक सर्व बाबती लहानशा एका लेखांत कोंबल्या गेल्यामुळें विवेचनाला पुरा वाव मिळाला नाहीं. ह्याच एका लेखांतील मुद्यांवर सबंध पुस्तकाएवढा मजकूर लिहितां येण्यासारखा आहे. स्त्रियांच्या पासूनच्या जातीय अपेक्षा पुरुषांनीं अनेकप्रकारें स्पष्टपणें जाहीर केल्या असतां स्त्रियांनीं मूग गिळून स्वस्थ बसणें रास्त नव्हे. पुरुषांच्या अपेक्षा कुठल्या बाबतींत पुऱ्या होणें शक्य नाहीं, त्यापासून उत्पन्न होणाऱ्या प्रतिक्रिया कोणत्या आणि खुद्द स्त्रियांच्या अशा पुरुषांबद्दलच्या अपेक्षा कोणत्या, स्त्री ही निर्बल, भावनारहित, केवळ उपभोग्य वस्तू आहे असें कल्पून पुरुषवर्गानें त्यांच्यावर लादलेल्या अपेक्षा कोणकोणत्या, किती आणि कशा चुकीच्या असतात हें अगदीं आधुनिक प्रकारच्या उघड मनोविश्लेषणात्मक लेखांनीं कुणी स्त्रीनें पुढें मांडलें पाहिजे. नव्याजुन्या आचारविचारांची सारखीच दाट ओळख असणाऱ्या आणि त्यांचा मेळ पाडण्याची शक्यता पटणाऱ्या या लेखिकेसारख्या एखाद्या पोक्त विदूषीनें हें महत्कार्य करणें जरूर आहे. सर्वांगसुंदर संसारचित्रें दुर्मिळ होत आहेत, पतिपत्नींतील असंतोष वाढत आहेत, संसार निरस आणि भीतिप्रद वाटूं लागले आहेत, अशा आणीबाणीच्या काळीं सर्व मुद्यांची स्पष्ट चिकित्सा वेळींच झाली नाहीं तर

समाजस्थैर्य नाहींसें होणार आहे. स्त्रीचें मन हें पुरुषांना न उकलतां येणारें एक गोड गूढ आहे. तो त्याला जपण्यासाठीं धडपडत असतो, पण जपणूक कशांत आणि कशानें होणार आहे, हेंच त्याला न उमगल्यामुळें पुष्कळसे प्रमाद त्याच्या हातून घडतात. तेव्हां एकाद्या पोक्त विदूषीने निःसंकोच विवेचन करण्यासाठीं पुढें आलें पाहिजे. अशा प्रकारचें लिखाण हें निःसंशय मौल्यवान ठरेल.

लेखसंग्रहांत एकंदर अकरा लेखांचा समावेश केलेला आहे. संसारविषयक म्हणून ' संसारचित्र ' ह्या उत्कृष्ट लेखाचा उल्लेख प्रामुख्यानें करावासा वाटतो. त्याच्या खालोखाल ' आमची विवाहसंस्था ' हा लेख असून पत्ररूपानें एका सुशिक्षित तरुणीनें विवाहविषयक आपले विचार पुढें मांडलेले आहेत. "शालिनी, आपल्याकडे घटस्फोटाची चाल नाहीं म्हणून वरून सारें स्थिरस्थावर दिसतें आहे. बाकी नीट पाहिलें तर सगळी घडी विस्कटलेली आहे" (पृ.३८). ह्या एका वाक्यानेंच आजच्या उध्वस्त संसारांचें चित्र उभें राहतें. ह्या लेखांत विवाहसंस्थेंतील दोष दाखवून ते घालविण्याचे उपायहि लेखिकेनें सुचविले आहेत. स्त्रीशिक्षणाची दिशा, ध्येय आणि तपशील काय असावेत, ह्यांचा उहापोह ' स्त्रीशिक्षणाची दिशा ' व ' स्त्रीशिक्षणविषयक योजना ' ह्या दोन लेखांत केला असून त्यातील विधायक सूचनांमुळें ते दोन्हीं लेख विचारांना चालना देणारे आहेत. केवळ वाङ्मयविषयक असे " स्फूर्ति असते काय ? " " मुलें आणि काव्य, " आणि " समाजांतले कारागीर " हे तीन निबंध होत. स्फूर्तीचा अर्थ फक्त कविकल्पनेपुरता मर्यादित करण्याचें कारण समजत नाहीं. संशोधक, शास्त्रज्ञ, समाजसेवक, शिक्षक, ह्यांनांच काय परंतु आपल्या विद्येचा विक्रय करण्याच्या आरोपामुळें हीन समजल्या जाणाऱ्या वकील आणि डॉक्टर ह्यांनाहि स्फूर्ति होते, स्फूर्ति जरूर असते. कमल आणि सुंदरीचा चेहरा अगर नेत्र ह्यांची निर्बुद्ध व अद्वातद्वा संगती जोडून देणाऱ्या कवीपेक्षां भौक्तिकशास्त्र सिद्धांताच्या योगानें पदार्थांचे नवीन गुणधर्म शोधून काढण्याचे आणि त्यांचे नवीन ऋणानुबंध लावून नवीन घटना अगर वस्तू निर्माण करणाऱ्या संशोधक शास्त्रज्ञांची स्फूर्ति ही खात्रीनें उच्च दर्जाची, मूर्त महत्त्वाची समजली पाहिजे. ' मुलें व काव्य ' ह्या लेखांत शिशुसौंदर्याबद्दल कवींचे विचार नमूद करून त्यांना विशेष रीतीनें जपण्याबद्दल उपदेश केला आहे. ' समाजांतले कारागीर ' हा एक लघुनिबंध असून तंत्र, भाषा, हेतू आणि रचना ह्या सर्व कसोट्या लावतांहि तो उत्कृष्ट

ठरेल. ‘ इंग्लंडमधील स्त्रिया ’ ह्या लेखांत तेथील स्त्रियांनीं अधिकारप्राप्तीसाठीं केलेल्या यशस्वी प्रयत्नांचा इतिहास दिलेला असून ‘ उत्तिष्ठत, जाग्रत ! ’ ह्या लेखांत भगिनींना आत्मोन्नति करून घेण्यासाठीं कळकळीचा उपदेश केलेला आहे. ‘ मुलींचा वारसाहक्क ’ ह्या लेखांत एका कायदेशीर प्रश्नाचे व्यवहार, भावना, सामाजिक न्याय, ह्यांच्या मांडणीवरून केलेलें विवेचन उद्बोधक झालें आहे.

शांतिकुंज हा लेखसंग्रह वाचकांना आल्हाद देईल खरा परंतु नवीनच अपेक्षा त्यांच्या ठिकाणीं निर्माण करीलहि. वाचकांची वृत्ति लहान मुलांसारखीच असते. थोडा खाऊ हातावर ठेवला म्हणजे जसें त्यांच्या तोंडाला जास्तच पाणी सुटतें, तसेंच सुंदर लिखाण थोडेसेंच तोंडावर टाकण्यानें वाचकांची क्षुधा अधिकच वाढते. तेव्हां ती पुरी करण्याची जबाबदारी आणि जरूरी लेखिकेनें ओळखणें जरूर आहे. स्त्रियांच्या परवशतेला पुरुषांपेक्षां सुद्धां स्त्रियांचें अज्ञान आणि दुबळेपणाच जास्त जबाबदार आहेत, तेव्हां त्यांच्या भिन्र्या मनाला हुरुप आणण्यासाठीं आणि त्यांना कार्यप्रवृत्त करण्यासाठींहि बरेच मुद्दे लेखिकेनें निबंधांतून विखुरलेले आहेत. खुद्द लेखिका ह्या आजच्या स्त्रीसमाजाच्या प्रामाणिक आणि कर्तव्याभिमुख प्रतिनिधी आहेत, तेव्हां त्यांच्या लिहिण्यांत स्त्रीसमाजाला बराच जिव्हाळा आढळेल आणि सुधारणांचे बरेच नवीन मार्ग सांपडतील, यांत शंका नाहीं. आयुष्यांत भल्याबुऱ्या प्रसंगांची धूळ खात असतां लेखक हा त्यांतून विचारांचे तेजःकण गोळा करीत असतो, सहानुभूतीच्या ओंजळीनें वाचकांना अर्पित असतो, उद्देश येवढाच कीं इतरांना फार धूळ खावी लागूं नये, सरळ मार्ग सांपडावा. खरोखरच वाचकांना सन्मार्ग सांपडला नाहीं तरी आपण आपलें बंधुकृत्य केलें, असें समाधान लेखक मिळवूं शकतो, स्वतःच्या जीविताचें सार्थक साधूं शकतो. येवढी उच्च भूमिका सामाजिक प्रश्नावर विचार-प्रवर्तक लिखाण लिहिणाऱ्या लेखकाची असते. प्रस्तुत संग्रहांत ग्रथित केलेले विचारप्रवर्तक, कळकळीचे, समतोल बुद्धीनें लिहिलेले लेख अवश्य वाचनीय आहेत. लेखांची भाषा साधी व सुटसुटीत आहे.

हे लेख लिहिल्याबद्दल आणि आतां ते एकत्र छापून कायम टिकणाऱ्या पुस्तकस्वरूपांत प्रसिद्ध केल्याबद्दल सौ. शांताबाई नाशिककर यांचें अभिनंदन करणें जरूर आहे.

बडोदें, रंगपंचमी
२८–३–४०

वासुदेव विनायक जोशी

---

# आभारांजलि

राजरत्न **वा. वि. जोशी** हे एक विद्वान् साहित्यिक, वकील आणि शिवाय समाजसेवक असे असल्यामुळें, त्यांचा वेळ किती बहुमोल आहे हें सांगण्याची जरुरी नाहीं. त्यांतही एका सांसारिक अडचणीची भर पडली असतांही वेळांत वेळ काढून, माझ्या लेखसंग्रहाला मार्मिक प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल मी त्यांना कितीही आभारांजलि अर्पण केल्या तरी त्या अपुऱ्याच पडणार आहेत.

श्री. **ना. ल. कोकाटे** यांनीं निवळ धंद्याची दृष्टि न ठेवतां मला पुस्तक छपाईचे बाबतींत साहाय्य केलें त्याबद्दल त्यांचेही आभार मानणें आवश्यकच आहे.

**शांता नाशिककर.**

# अनुक्रमणिका

# शांतिकुंज

( जाति– मोहिनी. – जरी कुणा श्रीमंतांची० )

क्रूर निबिड आयुष्याचें रान चालतांना
अंधकार दुर्दैवाचा व्यापि दशदिशांना
बोंचतीं जिव्हारीं कांटे रक्तबिंदु गळती
भालू ते तेशीं घुबडें दावितात भीती
धायिंधायिं कितिदां रडलें, धैर्यही गळालें
सहाय्यार्थ कोणी येना, तुला आळवीलें
मंजुनाद तव वीणेचा देवि, ऐकियेला
प्रतिध्वनी हृदयांतरिं कीं तयाचा निघाला
देहभान विसरुनि गेलें, दु:खही निमालें
मग नसांनसांतुन वारें सुखाचेंच खेळें
क्षणभरांत बदले सृष्टी जाहला प्रकाश
आंसवें गळालीं वृक्षां पोषितीं लतांस
कुंज हृदयहारी बनला शांति दे मनास
रक्तबिंदु सुमनें बनुनी करिति पखरणीस
जो प्रसाद देवि, प्रेमें तुवां अर्पियेला
मजसमान सुखवो सकलां पुरवि कामनेला.

दिसून येते. ऐतिहासिक कादंबऱ्यांना अनुकूल काल आतां उरला नसल्यानेंच केवळ त्यांच्या "साम्राज्यासाठीं" आणि "कौमुदी" ह्या दोन्हीं कादंबऱ्यांची तितकीशीं बोलबाला होऊ शकली नाहीं. हरीभाऊंच्या काळांत ह्या सर्व कादंबऱ्या यथाक्रम प्रसिद्ध होत्या तर कदाचित् ऐतिहासिक कादंबऱ्यांमुळेंच त्यांना प्रसिद्धी जास्त लाभती आणि सामाजिक कादंबऱ्यांचा अनुक्रम खालींहि लागला असता. कालाची अनुकूलता कादंबरीइतकी दुसऱ्या कोणत्याच वाङ्मयनिर्मितीला आणि प्रसिद्धीला लागत नसावी.

लेखिकेच्या मनोभूमिकेची थारेपालट जी कादंबऱ्यांतून उत्तरोत्तर होत गेलेली दिसते, तिचा परिपाकच जणूं ह्या निबंधांतून प्रत्ययाला येतो. मानवी मन हें गूढ खरेंच; परंतु पुरुषी मनाचें मनोविश्लेषण आज शेंकडों वर्षें इतक्या विपुलतेनें आणि विविधतेनें होऊन गेलें आहे की, पुरुषांच्या सुष्टदुष्ट मनोरचनांचें चित्रीकरण सर्वतोप्रकारें येऊन गेलें आहे. पुरुषांनीं केलेलें स्त्रियांसंबंधीचें लिखाण, अपुरें आणि असत्य असण्याचा संभव असतांनाहि अजूनहि प्रमाणभूत धरण्याकडे वाचकांचा कल असतो, याला जबाबदार स्त्रीलेखकांची अल्पसंख्या असली तरी खुद्द स्त्रीलेखकांचा संकोच शेवटीं जबाबदार आहे. सध्यांचें वाङ्मय प्राधान्येंकरून मनोविश्लेषणात्मक असल्यानें स्त्रीमनाचें गूढ स्वतः स्त्रीलेखिकांनींच निःसंकोचपणें उकलून दाखवावें अशी वाचकांची मुख्य अपेक्षा असते. लेखनाचा हेतू आणि प्रकार, ह्यादृष्टीनें स्त्रीलेखिकांचे दोन गट आढळून येतात. एक चढाईखोर पुरुषी थाटाचा; आणि दुसरा सहनशील विचारवंतांचा. पुरुषी थाटाच्या लेखिका पुरुषी भाषा बोलतील लिहितील, रूढींवर प्रखर हल्ले चढवितील, वरेरकरी नायिकेप्रमाणें पुरुषांनाच सर्वांबद्दल जबाबदार धरून त्यांच्या डोक्यावर चपलप्रहार करतील, इतकेंच नव्हे तर मनोविश्लेषणाच्या ईर्षेला चढून उत्तान आणि विकृत स्वभावचित्रें रंगवितील. परंतु ह्या गटास एकंदर स्त्रीसमाजाचा प्रतिनिधी म्हणून मानतां यावयाचा नाहीं. दुसरा गट सर्व सामाजिक अन्यायांचे जुलूम अगतिकांच्या सहनशीलतेनें सहन करील, रूढींच्या ऐवजीं रूढींना हट्टानें चिकटून राहणाऱ्या समाजाला व वेळीं स्वतःलाच दोष लावील, आधुनिक विचारांनीं भयभीत होऊन जुन्या परंपरेकडे धावेल आणि चालीरीतींच्या स्वप्नींहि नसलेलीं नैतिक मूल्यें शोधून काढून नव्याजुन्यांच्या दरडींना जोडणारा सुवर्णमध्यमाचा पूल बांधण्याची खटपट करील. स्त्रीसमाजाची आजची मनोरचना, अज्ञान,

परवशता, लक्षांत घेतली तर दुसरा गट हाच जवळ जवळ त्यांचे खरेखुरें विचार बोलून दाखवितो असें म्हणावें लागेल. सौ. शांताबाईचे प्रस्तुतचे निबंध पाहिले तर त्यांना ह्या दुसऱ्या गटांत मोजावें लागेल. ' नेमधर्म ' हाच लेख घ्या. तांत्रिक धर्माचरणाच्या तावडींत सांपडलेल्यांनीं व्रतवैकल्यें, नेमधर्म, प्रसृत केले, आणि ईप्सितांच्या लोभांनीं बहुजनसमाजानें अंगिकारले, पण लेखिकेनें मनोनिग्रह, आत्मविकास, आरोग्यवर्धन, शिस्त, काटकपणा हीं साधण्यासाठीं नेमधर्म प्रत्येकानें अवश्य पाळावेत असें सांगून, प्रदक्षिणा घालणें, नक्त करणें इत्यादि नियमधर्मांची तरफदारी केली आहे. पण पुढें त्या लिहितात ' पण असले नियम सुशिक्षित बायका करूं लागल्या तर मात्र तें हास्यास्पद ठरेल. ' ( पृष्ठ ५३ ) " सुशिक्षितांनीं जुन्या नियमांत साष्टांग नमस्कार, प्राणायाम, आसनें, वाचन, ज्ञानदान करणें—समाजसेवा करणें—असल्या नियमांची भर टाकावी. " ( पृष्ठ ५७ ) धार्मिक संस्कारांचा पगडा स्त्रियांच्या मनावर विशेष असतो आणि तीच स्थिति लेखिकेचीहि दिसून येते. स्त्रीशिक्षणविषयक योजनेंत ' धर्मविधींकडेहि अवश्य लक्ष द्यावें. हल्लींच्या रूढ विधींना विचारपूर्वक वेगळें वळण देणें अवश्य आहे. " ( पृ. २९ ) असें त्यांनीं सुचविलें आहे. एकंदरींत भावनांनीं लेखिका ही खात्रीनें एकंदर स्त्रीसमाजाची अधिकृत प्रतिनिधी गणली जाण्यास पात्र आहे.

लेखिकेच्या भावना जुन्या वळणाच्या असल्या तरी विचार आधुनिक आहेत आणि नवे विचार रूढ भावना न दुखतील अशा शब्दांनी मांडण्यांत त्यांनीं दाखविलेला लेखनसंयम प्रशंसनीय आहे खास. वरचढपणाबद्दल कुणाहि सुशिक्षित स्त्रीनें पुरुषांचे शेलक्या शब्दांनीं वाभाडे काढले असते, आणि वेळीं चांभारपूजाहि बांधली असती; तोच भाव, तीच चीड लेखिकेनें मोठ्या समर्पकतेनें आणि विनयानें व्यक्त केलीं आहेत. " प्रत्येक वेळेला स्त्रीलाच नमवावयाचें यांत यत्किंचित् सुद्धा पुरुषार्थ नाहीं; बळी तो कान पिळी हें रानटी तत्त्वच त्यांत आहे " ( पृ. ७४ ) " स्त्रीच्या कामाचें कौतुक पतीनें केलें नाहीं तर दुसरें कोण करणार ! " ( पृ. ७६ ). जुन्या भावना नवीन विचारांच्या आंखणींत आणि उजळा देऊन मांडावयाच्या, आणि नव्या भावना चालू परंपरेच्या पोटांत अलगद भरावयाच्या, अशी लेखिकेची प्रमूख भूमिका दिसते. एकत्र कुटुंबपद्धतींतहि त्यांना चांगल्या घटना दिसतात, वाईट घटना दुरुस्त करण्याची

शक्यता वाटते आणि त्याचबरोबर विभक्त कुटुंबांतील गुणहि त्या कबूल करतात. असे विचार सकृद्दर्शनी धरसोडीचे दिसतीलहि. परंतु नव्या जुन्यांची सांगड घालून दोघांनाहि कालौघाबरोबर लोटीत न्यावयाचें असें व्यापक ध्येय त्यांच्या पुढें त्यांनीं ठेवलेलें दिसतें. " स्त्रियांचें काम घरांतल्या घरांत असतें, दिवसभर राबलें तरी सांगतां येत नाहीं, त्यांना कामाचा मोबदलाहि मिळत नाही म्हणून तें विनामूल्य समजलें जातें." (पृ.७६) " पत्नीचें तारुण्य नेहमीं टिकून राहावें असें जर प्रत्येक पतीला वाटत असेल, तर तिच्या करमणुकीसाठीं पतीनें ऐपतीप्रमाणें तयार असलें पाहिजे; नाहींतर घरांतील एकसुरी कामकाजामुळें तिचें पूर्वीचें उल्हसित मन उदासीन होऊन ती पोक्त बनली तर त्याचा दोष कोणाकडे ? " ( पृ. ७७ ) असे हे विचार ह्याच नव्या जुन्या अशा भिन्न मनोरचनेचे द्योतक आहेत.

ही लेखिकेची भूमिका लक्षांत घेऊन पुस्तक वाचूं लागलें म्हणजे स्पष्टार्थापेक्षां गूढार्थाची ओळख पटते. तरी त्यांच्या लेखांत मनोविश्लेषण पुष्कळ ठिकाणीं अगदी स्पष्ट शब्दांतहि सांपडेल. ह्या दृष्टीनें संसारचित्र हा लेख मार्मिक आहे खास. ' कित्येक संसार पहावे तेव्हां एकादाच संसार सर्व बाजूनीं रम्य दिसतो ' असें बजावून संसारचित्रें विफल करणाऱ्या बऱ्याच घटना त्यांनीं नमूद केल्या आहेत. " वधूवरांच्या वयांत दहाबारा वर्षांपेक्षां जास्त फरक असणें वाईट. वयोमानानें शरीर आणि मन यांत जे फेरबदल होत जातात, ते दोघांचे सारख्या प्रमाणांत झाले तर ठीक. नाहींतर बायको ऐन उमेदीत आणि नवरा उतार वयाचा ! म्हणजे त्यांचे जमावयाचें कसें ? " ( पृ. ७० ) ' पत्नीनें गबाळपणा दाखवला की स्वारी रागावलीच ! पण रसिकपणाच्या भावना पतीलाच तेवढ्या असतात आणि पत्नीला नसतात असें आहे कां ? बाहेर जातांना अगदीं सूट, नेकटाय-कॉलर घालून शृंगार करावयाचा आणि घरीं आल्यावर पंचा किंवा अंगाच्या घाटाला शोभत नसली तरी पोकळ विजार किंवा चड्डी घालायची, अंगांत कांहींच घालायचें नाहीं किंवा अर्ध्या बाह्यांचा सदरा घालावयाचा ! त्यामुळे छातीवरलें व पुढच्या हातावरलें केसांचें किळसवाणें दृश्य दिसत असतें. डोकीचे केस विसकटलेले, घामधुळीनें मळलेला चेहेरा आणि सिगारेटच्या वासानें युक्त असें तोंड, ह्या सर्व गोष्टींचा बायकांना कंटाळा

वाटत नाहीं अशी कां पुरुषांची समजूत आहे ? ... पुरुषांपेक्षां स्त्रियांचें मन हळुवार असतें, त्यांच्या भावना अधिच कोमल असतात, त्यांची रसिकता फार नाजूक स्वरुपाची असते, यासाठीं पुरुषांनीं फार जपलें पाहिजे ' ( पृ. ७७ ) 'पतिपत्नींना सामाजिक आयुष्य जरूर असतें. एकमेकांत गुरफटून त्यांचें आयुष्य कंटाळवाणें होईल ' ( पृ. ७९ ) ' परस्परांविषयीं दृढ श्रद्धा आणि विश्वास ठेवणें हें दोघांच्याहि मनस्वास्थ्याला जरूरीचे असतें. येवढया तेवढया गोष्टींवरून संशय धरून स्वतःचें मन पोखरल्यासारखें करावयाचें आणि मग मनाची खात्री करून घेण्यासाठीं एकमेकांवर टेहळणी करावयाची, नोकराना एकमेकांच्या पाळतीवर ठेवावयाचें किंवा एकमेकांना खोदून खोदून कुचकेनासके प्रश्न विचारावयाचे आणि रागवारागवी, चिडाचीड झाली कीं, मित्रमंडळीजवळ रडूनकढून गृहच्छिद्रें सांगत सुटावयाचें आणि निंदा करायची, यासारखी अजाणपणाची आणि आत्मघातकीपणाची दुसरी गोष्ट नाहीं. ' ( पृ. ७९ ) सूक्ष्म निरीक्षण, मार्मिक सूचना, संयम आणि समतोलपणा, ह्या सर्वांचा सुंदर मिलाफ ' संसारचित्र ' ह्या लेखांत सांपडेल. हा लेख मात्र अपुरा वाटतो. स्त्रीपुरुषविषयक सर्व बाबती लहानशा एका लेखांत कोंबल्या गेल्यामुळें विवेचनाला पुरा वाव मिळाला नाहीं. ह्याच एका लेखांतील मुद्यांवर सबंध पुस्तकाएवढा मजकूर लिहितां येण्यासारखा आहे. स्त्रियांच्या पासूनच्या जातीय अपेक्षा पुरुषांनीं अनेकप्रकारें स्पष्टपणें जाहीर केल्या असतां स्त्रियांनीं मूग गिळून स्वस्थ बसणें रास्त नव्हे. पुरुषांच्या अपेक्षा कुठल्या बाबतीत पुऱ्या होणें शक्य नाहीं, त्यापासून उत्पन्न होणाऱ्या प्रतिक्रिया कोणत्या आणि खुद्द स्त्रियांच्या अशा पुरुषांबद्दलच्या अपेक्षा कोणत्या, स्त्री ही निर्बल, भावनारहित, केवळ उपभोग्य वस्तू आहे असें कल्पून पुरुषवर्गानें त्यांच्यावर लादलेल्या अपेक्षा कोणकोणत्या, किती आणि कशा चुकीच्या असतात हें अगदीं आधुनिक प्रकारच्या उघड मनोविश्लेषणात्मक लेखांनीं कुणी स्त्रीनें पुढें मांडलें पाहिजे. नव्याजुन्या आचारविचारांची सारखीच दाट ओळख असणाऱ्या आणि त्यांचा मेळ पाडण्याची शक्यता पटणाऱ्या या लेखिकेसारख्या एखाद्या पोक्त विदूषीनें हें महत्कार्य करणें जरूर आहे. सर्वांगसुंदर संसारचित्रें दुर्मिळ होत आहेत, पतिपत्नींतील असंतोष वाढत आहेत, संसार निरस आणि भीतिप्रद वाटूं लागले आहेत, अशा आणीबाणीच्या काळीं सर्व मुद्यांची स्पष्ट चिकित्सा वेळींच झाली नाहीं तर

समाजस्थैर्य नाहींसें होणार आहे. स्त्रीचें मन हें पुरुषांना न उकलतां येणारें एक गोड गूढ आहे. तो त्याला जपण्यासाठीं धडपडत असतो, पण जपणूक कशांत आणि कशानें होणार आहे, हेंच त्याला न उमगल्यामुळें पुष्कळसे प्रमाद त्याच्या हातून घडतात. तेव्हां एकाद्या पोक्त विदूषीनें निःसंकोच विवेचन करण्यासाठीं पुढें आलें पाहिजे. अशा प्रकारचें लिखाण हें निःसंशय मोल्यवान ठरेल.

लेखसंग्रहांत एकंदर अकरा लेखांचा समावेश केलेला आहे. संसाराविषयक म्हणून ' संसारचित्र ' ह्या उत्कृष्ट लेखाचा उल्लेख प्रामुख्यानें करावासा वाटतो. त्याच्या खालोखाल ' आमची विवाहसंस्था ' हा लेख असून पत्ररूपानें एका सुशिक्षित तरुणीनें विवाहविषयक आपले विचार पुढें मांडलेले आहेत. "शालिनी, आपल्याकडे घटस्फोटाची चाल नाहीं म्हणून वरून सारें स्थिरस्थावर दिसतें आहे. बाकी नीट पाहिलें तर सगळी घडी विस्कटलेली आहे" (पृ.३८). ह्या एका वाक्यानेंच आजच्या उध्वस्त संसारांचें चित्र उभें राहतें. ह्या लेखांत विवाहसंस्थेंतील दोष दाखवून ते घालविण्याचे उपायहि लेखिकेनें सुचविले आहेत. स्त्रीशिक्षणाची दिशा, ध्येय आणि तपशील काय असावेत, ह्यांचा उहापोह ' स्त्रीशिक्षणाची दिशा ' व ' स्त्रीशिक्षणविषयक योजना ' ह्या दोन लेखांत केला असून त्यांतील विधायक सूचनांमुळें ते दोन्ही लेख विचारांना चालना देणारे आहेत. केवळ वाङ्मयविषयक असे " स्फूर्ति असते काय ? " " मुलें आणि काव्य, " आणि " समाजांतले कारागीर " हे तीन निबंध होत. स्फूर्तीचा अर्थ फक्त कविकल्पनेपुरता मर्यादित करण्याचें कारण समजत नाहीं. संशोधक, शास्त्रज्ञ, समाजसेवक, शिक्षक, ह्यांनांच काय परंतु आपल्या विद्येचा विक्रय करण्याच्या आरोपामुळें हीन समजल्या जाणाऱ्या वकील आणि डॉक्टर ह्यांनाहि स्फूर्ति होते, स्फूर्ति जरूर असते. कमल आणि सुंदरीचा चेहरा अगर नेत्र ह्यांची निर्बुद्ध व अद्वातद्वा संगती जोडून देणाऱ्या कवीपेक्षां भौक्तिकशास्त्र सिद्धांताच्या योगानें पदार्थांचे नवीन गुणधर्म शोधून काढण्याचे आणि त्यांचे नवीन ऋणानुबंध लावून नवीन घटना अगर वस्तू निर्माण करणाऱ्या संशोधक शास्त्रज्ञांची स्फूर्ति ही खात्रीनें उच्च दर्जाची, मूर्त महत्त्वाची समजली पाहिजे. ' मुलें व काव्य ' ह्या लेखांत शिशुसौंदर्याबद्दल कवींचे विचार नमूद करून त्यांना विशेष रीतीनें जपण्याबद्दल उपदेश केला आहे. ' समाजांतले कारागीर ' हा एक लघुनिबंध असून तंत्र, भाषा, हेतू आणि रचना ह्या सर्व कसोट्या लावतांहि तो उत्कृष्ट

ठरेल. 'इंग्लंडमधील स्त्रिया' ह्या लेखांत तेथील स्त्रियांनीं अधिकारप्राप्तीसाठीं केलेल्या यशस्वी प्रयत्नांचा इतिहास दिलेला असून 'उत्तिष्ठत, जाग्रत !' ह्या लेखांत भगिनींना आत्मोन्नति करून घेण्यासाठीं कळकळीचा उपदेश केलेला आहे. 'मुलींचा वारसाहक्क' ह्या लेखांत एका कायदेशीर प्रश्नाचें व्यवहार, भावना, सामाजिक न्याय, ह्यांच्या मांडणीवरून केलेलें विवेचन उद्बोधक झालें आहे.

शांतिकुंज हा लेखसंग्रह वाचकांना आल्हाद देईल खरा परंतु नवीनच अपेक्षा त्यांच्या ठिकाणीं निर्माण करीलहि. वाचकांची वृत्ति लहान मुलांसारखीच असते. थोडा खाऊ हातावर ठेवला म्हणजे जसें त्यांच्या तोंडाला जास्तच पाणी सुटतें, तसेंच सुंदर लिखाण थोडेसेंच तोंडावर टाकण्यानें वाचकांची क्षुधा अधिकच वाढते. तेव्हां ती पुरी करण्याची जबाबदारी आणि जरूरी लेखिकेनें ओळखणें जरूर आहे. स्त्रियांच्या परवशतेला पुरुषांपेक्षां सुद्धां स्त्रियांचें अज्ञान आणि दुबळेपणाच जास्त जबाबदार आहेत, तेव्हां त्यांच्या भिऱ्या मनाला हुरुप आणण्यासाठीं आणि त्यांना कार्यप्रवृत्त करण्यासाठींहि बरेच मुद्दे लेखिकेनें निबंधांतून विखुरलेले आहेत. खुद्द लेखिका ह्या आजच्या स्त्रीसमाजाच्या प्रामाणिक आणि कर्तव्याभिमुख प्रतिनिधी आहेत, तेव्हां त्यांच्या लिहिण्यांत स्त्रीसमाजाला बराच जिव्हाळा आढळेल आणि सुधारणांचे बरेच नवीन मार्ग सांपडतील, यांत शंका नाहीं. आयुष्यांत भल्याबुऱ्या प्रसंगांची धूळ खात असतां लेखक हा त्यांतून विचारांचे तेजःकण गोळा करीत असतो, सहानुभूतीच्या ओंजळीनें वाचकांना अर्पित असतो, उद्देश येवढाच कीं इतरांना फार धूळ खावी लागूं नये, सरळ मार्ग सांपडावा. खरोखरच वाचकांना सन्मार्ग सांपडला नाहीं तरी आपण आपलें बंधुकृत्य केलें, असें समाधान लेखक मिळवूं शकतो, स्वतःच्या जीविताचें सार्थक साधूं शकतो. येवढी उच्च भूमिका सामाजिक प्रश्नावर विचार-प्रवर्तक लिखाण लिहिणाऱ्या लेखकाची असते. प्रस्तुत संग्रहांत ग्रथित केलेले विचारप्रवर्तक, कळकळीचे, समतोल बुद्धीनें लिहिलेले लेख अवश्य वाचनीय आहेत. लेखांची भाषा साधी व सुटसुटीत आहे.

हे लेख लिहिल्याबद्दल आणि आतां ते एकत्र छापून कायम टिकणाऱ्या पुस्तकस्वरूपांत प्रसिद्ध केल्याबद्दल सौ. शांताबाई नाशिककर यांचें अभिनंदन करणें जरूर आहे.

बडोदें, रंगपंचमी
२८-३-४०

**वासुदेव विनायक जोशी**

# आभारांजलि

राजरत्न **वा. वि. जोशी** हे एक विद्वान् साहित्यिक, वकील आणि शिवाय समाजसेवक असे असल्यामुळें, त्यांचा वेळ किती बहुमोल आहे हें सांगण्याची जरुरी नाहीं. त्यांतही एका सांसारिक अडचणीची भर पडली असतांही वेळांत वेळ काढून, माझ्या लेखसंग्रहाला मार्मिक प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल मी त्यांना कितीही आभारांजलि अर्पण केल्या तरी त्या अपुऱ्याच पडणार आहेत.

श्री. **ना. ल. कोकाटे** यांनीं निवळ धंद्याची दृष्टि न ठेवतां मला पुस्तक छपाईचे बाबतींत साहाय्य केलें त्याबद्दल त्यांचेही आभार मानणें आवश्यकच आहे.

**शांता नाशिककर.**

# अनुक्रमणिका

# शांतिकुंज

( जाति– मोहिनी. – जरी कुणा श्रीमंतांची० )

क्रूर निबिड आयुष्याचें रान चालतांना
अंधकार दुर्दैवाचा व्यापि दशदिशांना
बोंचतीं जिव्हारीं कांटे रक्तबिंदु गळती
भालू ते तैशीं घुबडें दावितात भीती
धायिंधायिं कितिदां रडलें, धैर्यही गळालें
सहाय्यार्थ कोणी येना, तुला आळवीलें
मंजुनाद तव वीणेचा देवि, ऐकियेला
प्रतिध्वनी हृदयांतरिं कीं तयाचा निघाला
देहभान विसरुनि गेलें, दुःखही निमालें
मग नसांनसांतुन वारें सुखाचेंच खेळें
क्षणभरांत बदले सृष्टी जाहला प्रकाश
आंसवें गळालीं वृक्षां पोषितीं लतांस
कुंज हृदयहारी बनला शांति दे मनास
रक्तबिंदु सुमनें बनुनी करिति पखरणीस
जो प्रसाद देवि, प्रेमें तुवां अर्पियेला
मजसमान सुखवो सकलां पुरवि कामनेला.

# शांतिकुंज

# निबंधपरवरण

## स्फूर्ति असते काय ? : : १

स्फूर्ति वगैरे सब झूट आहे, आपलें स्तोम माजवण्याकरितां कवींनीं उगीच हें स्फूर्तीचें बंड माजवलें आहे, त्यांत विशेष कांहींच नाहीं असें कित्येक लोक म्हणत असतात.

कोणी म्हणतात कीं, स्फूर्ति म्हणजे मनाची आत्यंतिक एकाग्रता. ही जर स्फूर्तीची व्याख्या असेल तर गणितज्ञांना अत्यंत कठिण उदाहरणें सोडवितांना स्फूर्तीच होते कीं काय ? कारण एकाग्रतेशिवाय कठिण उदाहरण सुटतच नाहीं.

इतकेंच काय पण सर्वच शास्त्रज्ञांना मानसिक एकाग्रतेची आवश्यकता असते. मनाची आत्यंतिक एकाग्रता झाली नाहीं तर त्यांना जगाचीं कोडीं उलगडतां कशीं येतील ?

पण म्हणून याला कांहीं स्फूर्ति म्हणत नाहींत.

कांहीं म्हणतात कीं, डोक्यांत एकाद्या वस्तूविषयीं अतिशय विचार येऊं लागले म्हणजे मनुष्याला ते सहन होत नाहींत. ते बाहेर टाकावे अशी त्याला तीव्र इच्छा उत्पन्न होते आणि मग स्फूर्ति होऊन काव्याचा उदय होतो.

स्फूर्तीविषयीं आणखी एक असें मत आहे कीं, एकादें शोकजनक किंवा आनंदकारक दृश्य पाहिलें म्हणजे मनोभावना उचंबळून येतात. भावना अतिशय उत्कट झाल्या म्हणजे स्फूर्ति होते. ही स्फूर्तीची व्याख्या पुष्कळ लोक ग्राह्य समजतात.

या व्याख्येविरुद्ध कांहीं असें विचारतात कीं, आईच्या मांडीवर तिचें मूल मृत होऊन पडलें असतां तिच्या शोकाला भरती येते. ज्या दुःखाला सीमा नाहीं असें तें दुःख असतें. त्यावेळीं मातेच्या भावना उचंबळून आलेल्या असतात. पण अशा स्थितींत तिला स्फूर्ति होत नाहीं. वास्तविक वरच्या व्याख्येप्रमाणें स्फूर्ति होऊन काव्य उत्पन्न व्हावें, परंतु तसें होत नाहीं. म्हणून भावनांचें उत्कटत्व हें स्फूर्तीचें कारण असें म्हणणें चूक होय.

पण ही व्याख्या कांहीं निखालस चुकीची नाहीं. ती अपूर्ण आहे इतकें मात्र खरें. त्यांतील जो चुकीचा भाग आहे त्यावर वरील आक्षेप लागू पडण्यासारखा आहे. स्फूर्तीच्या वर आणखी ज्या दोन व्याख्या केलेल्या आहेत त्याही अर्धवटच आहेत.

केवळ भावनांचें उत्कटत्व याला स्फूर्ति म्हणतां येणार नाहीं. हर्षशोकादिकांनीं भावना अतिशय उचंबळून आल्या असतां स्फूर्ति होणेंच अशक्य आहे. मांडीवर मेलेलें मूल असतांना काय किंवा नवसासायासांनीं झालेल्या पुत्रजन्मोत्सवानें काय मन भोंवऱ्यांत सांपडल्याप्रमाणें झालें असतां स्फूर्ति होईल तरी कशी ?

भावनांचें उत्कटत्व स्फूर्तीला जितकें आवश्यक आहे तितकेंच विचारांचें उत्कटत्वही आहे. विचारांचें उत्कटत्व होण्यास मनाची तल्लीनता व्हावी लागते. हृदय आणि मेंदू, भावना आणि विचार यांचा जेव्हां गोड मिलाफ होतो तेव्हांच स्फूर्ति होते. मन शोकरसांत, आनंदरसांत किंवा प्रेमरसांत बुडून गेलें असतां विचारांना वावच नसतो. त्यावेळीं मन वेडें बनलेलें असतें. भोंवऱ्यांत सांपडलेल्या जलबिंदूंप्रमाणें हजारों विचार येतात आणि मस्तक भ्रमवून टाकतात.

संथपणें वहात जाणाऱ्या नदीप्रवाहाप्रमाणें जेव्हां विचारांचा ओघ असतो तेव्हां स्फूर्ति होते. या वेळीं भावना उत्कट असूनही मनुष्य विचार करण्यास पूर्णपणें समर्थ असतो. या वेळीं मनांत शोकदायक विचार जरी असले तरी मन एकप्रकारच्या आनंदानें भरून गेलेलें असतें; पण हा आनंद देखील शांतस्वरूपाचा असतो.

अजविलाप वाचीत असतां वाचकाला दुःख होतें. तरीसुद्धां वाचनापासून आनंद होतो. महाश्वेतेला झालेल्या शोकाचें वर्णन हृदय हलवून सोडतें; पण तरी देखील आपण तो भाग पुन्हां पुन्हां मोठ्या आवडीनें वाचीत असतों. याचें कारण असें कीं, त्या दुःखांत रम्यपणा असतो.

मेलेलें मूल मांडीवर असतां मातेला काव्य सुचत नाहीं. परंतु कांहीं कालानें या प्रसंगाचें स्मरण होऊन तिला दुःख होतें. या स्मरणसमयीं तिला स्फूर्ति होणें अगदीं शक्य आहे. या वेळीं तिचें दुःख स्मृतिरूप असतें आरशांत मनुष्याचें प्रतिबिंब पडलें असलें तरी त्यामुळें आरशाला कांहीं विकृति होत नाहीं. मग पुढें उभ्या असलेल्या मनुष्यानें वाटेल तितकी हालचाल केली तरी आरसा जशाचा तसाच रहातो. त्याचप्रमाणें प्रथम झालेल्या शोकाचें हें स्मृतिरूप दुःख निवळ प्रतिबिंब असल्यामुळें मनाची खरी शांतता त्यामुळें ढळत नाहीं. इतकेंच नव्हे तर या वेळच्या दुःखांत एक प्रकारचा मोहकपणा असतो. म्हणूनच नव्या नव्या रम्य कल्पना सुचून स्फूर्ति होते.

कवि यावेळीं एकाद्या नटाप्रमाणें आणि त्याच वेळीं प्रेक्षकाप्रमाणें वागत

असतो. " एकच प्यास्यांतील " सिंधूची भूमिका वठवतांना रा. बालगंधर्वांची सिंधूशीं एकतानता झालेली असते; पण आपण खरोखरी सिंधू नाहीं ही जाणीव त्यांच्या अंतर्यामीं असतेच. तशी जाणीव त्यांना न रहाती आणि ते खरोखरच्या दुःखांत बुडून गेले असते तर त्यांना पुढील वाक्यें सुचलीं नसतीं आणि त्यांचे हावभावही इतके रम्य झाले नसते. खरोखरचें दुःख पाहण्यांत कांहीं आपल्याला मजा वाटत नाहीं; पण हें कृत्रिम दुःख पाहण्यासाठीं मात्र आपण पुन्हां पुन्हां जातों.

महाश्वेतेच्या शोकाचें वर्णन करतांना बाणकवि स्वतःच महाश्वेतेची भूमिका मनानें वठवीत होता. देहानें स्वस्थ निजलों असूनही आपण सुप्तावस्थेंत नानाप्रकारचे व्यवहार करीत असतों. तशींच यावेळीं कवीची अवस्था असते. स्वतःचें पूर्वीचें दुःख वर्णीत असतांसुद्धां कवि आपली स्वतःची मागली भूमिका—खरोखरी दुःखभरांत असल्या वेळची-वठवीत असतो, आणि शिवाय प्रेक्षकाचेंही काम करून भूमिका चांगली उतरल्यास आनंद अनुभवीत असतो.

पण यावेळीं त्याचें दुःख अती तीव्र स्वरूपाचें झालें, विचाराला अवसर न राहतां मन व्याकुळ होऊन गेलें तर अर्थातच स्फूर्ति होणार नाहीं.

नुसत्या भावना उचंबळून आल्यानें केव्हांच चांगलें काव्य होणार नाहीं. नाहीं तर शोकभरांत मनुष्य कित्येक वेळां कांहींतरी बोलतो. ते शब्द ऐकवत नाहींत इतका त्यांत शोक भरलेला असतो, त्या बोलण्यालाच काव्य म्हणण्याची आपत्ती ओढवेल. विचार विस्कळित असतां असंबद्धपणें बोललेल्या वाक्यांना कुणी काव्य म्हणेल कां ?

अलीकडे कांहीं लोकांना कवितेंत चुकीची शब्दयोजना करण्याचें खूळ लागलें आहे. कविता निर्दोष झाली कीं भावनांचें उत्कटत्व कवितेंत उतरल्याचें सिद्ध होत नाहीं अशी यांची समजूत असते, पण ती अगदीं चुकीची आहे.

स्फूर्ति होते त्यावेळीं बुद्धि आपल्या संपूर्ण तेजानें प्रकाशत असते. उत्कट भावना आणि तीव्र बुद्धि या जोडीनें काम करीत असतात. बुद्धि आणि

भावना या दोघी आपली मर्यादा उल्लंघन न करतां आपापलें सौंदर्य यथाशक्ति प्रगट करतात आणि एकमेकींचेंही सौंदर्य खुलवितात. म्हणूनच एरवीं न सुचणारी सुंदर आणि रसोत्कर्षक शद्बसंपत्ति यावेळीं आठवते; मनाला चटका लावणाऱ्या रम्य कल्पना सुचतात; शद्बालंकार आणि रसालंकार यांचा मधुर मिलाफ होऊन गोड, निर्दोष आणि उत्कृष्ट कविता निर्माण होते.

उत्तम बुद्धिवैभव फारच थोड्यांच्या वाट्याला येतें. कोमल मनोभावनाही फारच थोड्या लोकांना असतात. अशा या दोन मौल्यवान् गोष्टींचा एका माणसाच्या ठायीं वास घडणें फारच कठिण. आणि त्यांत या दोघींचा मधुर मिलाफ होणें म्हणजे कपिलाषष्ठीचा योगच म्हणावयाचा. अशी वस्तुस्थिति असतां स्फूर्ति म्हणजे कांहीं दैवयोगानें होते असें म्हटलें तर त्यांत अतिशयोक्तीचें काय आहे ? आणि उत्तम कवि शास्त्रवेत्त्यापेक्षांही वरिष्ठ दर्जाचा असें आजपर्यंत जग मानीत आलें त्यांत तरी चूक काय आहे ?

पूर्वींचे लोक पाऊस आला कीं देवाची कृपा समजत आणि अवर्षण पडलें कीं देव कोपला असें म्हणत. आतां शास्त्रज्ञांनीं शोध लावले आहेत. पाऊस येण्यांत देवाचा कांहीं दखील संबंध नाहीं. पाण्याचे ढग होतात, ऊष्णतेनें ते वितळतात, पाऊस येतो, सर्व गोष्टीं अगदीं साध्यासुध्या आहेत असें ते सांगतात. पण मर्जी लागेल तेव्हां मेघांना आज्ञा करून पाऊस तर त्यांना आणतां येत नाहीं ना ? ‘ येरे येरे पावसा ’ म्हटल्यानें पाऊस येत नाहीं किंवा ‘ नको पडूं ’ म्हटल्यानें थांबत नाहीं. त्याची मर्जी लागेल तेव्हांच तो येतो आणि जातो. ( कृत्रिम पाऊस आणला तरी तो निकृष्ट दर्जाचाच ठरणार. ) त्याचप्रमाणें स्फूर्तीला ये म्हणून आळवल्यानें ती येत नाहीं किंवा आतां नको म्हटलें तरीं यावयाची रहात नाहीं.

स्फूर्ति अशी अशी होते, त्यांत सरस्वतीदेवीच्या प्रसादाचा किंवा कोपाचा कांहीं संबंध नाहीं असें म्हटलें तरी स्फूर्ति होणें न होणें कांहीं कोणाला साध्य होत नाहीं. मानवी सामर्थ्याबाहेरची ती गोष्ट आहे. स्फूर्तीला बळेनें ओढून आणलें तर नीरस काव्य निपजतें. स्फूर्ति स्वखुषीनें आली तरच उत्तम काव्य-

निर्मिती होते. एकाच कवीचें एक काव्य उत्कृष्ठ आणि दुसरें निकृष्ठ होण्याचें कारण तरी हेंच आहे.

आणि म्हणून स्फूर्ति दैवी प्रसादानें होते असे म्हणण्याचा प्रघात पडला आहे. खऱ्या स्फूर्तीचा अनुभव फारच थोड्यांना येतो—अगदीं फारच थोड्यांना येतो. कोट्यावधि लोकांत मिल्टन किंवा टागोर यांच्यासारख्या दोनचार भाग्यवान लोकांनाच ती लाभते. तरीसुद्धां त्यांच्यावर तिचा नेहेमींच अनुग्रह होतो असें नाहीं. तिच्या अवकृपेमुळें त्यांच्यासारख्यांचींही कांहीं काव्यें नीरस होतात.

पुष्कळसे लोक स्फूर्तीला बळेनें ओढून आणण्याचा प्रयत्न करतात. स्फूर्तीचें त्यांना फार तर ओझरतें दर्शन घडतें. या वेळीं स्फूर्ति जणूं तोंडावर झिरझिरीत अवगुंठन घेऊन येते; पण तें न कळून खऱ्या स्फूर्तीचें दर्शन झालें असें समजून स्फूर्ति आणणें न आणणें आपल्या हातांत आहे असें हे लोक प्रतिपादीत असतात.

इतरेजन स्फूर्ति वगैरे सब झूट आहे असें कंठशोष करून सांगत असतात. आंधळ्याला सूर्य दिसला नाहीं म्हणजे जसा कांहीं सूर्य नसतोच !

---

## मुलें व काव्य : : २

शशिकला आकाशांत चमकूं लागली कीं, सागर जसा उचंबळूं लागतो तसेंच, सौंदर्य [ केवळ दैहिक नव्हे ] पाहिलें कीं, कविहृदयावर आनंदोर्मि उसळून येतात आणि त्या काव्यरूपानें बाहेर पडतात. आजपर्यंत कितीतरी कविश्रेष्ठांनीं बालकांविषयीं मनोहर कविता रचलेल्या आहेत.

मुलांच्या ठिकाणीं असें काय बरें आकर्षक सौंदर्य आहे कीं, ज्याचें दर्शन झाल्यामुळें कवीला इतका आनंद होऊन तो आनंद इतरांनीं लुटावा

अशी त्याला इच्छा होते ? आकाशांत हंसणाऱ्या तारकांचें, सरोवरांतील कमलांचें किंवा वृक्षवेलींवरील पुष्पांचें आणि त्यांवर विहार करणाऱ्या पक्ष्यांचें जें सौंदर्य—तेंच तें सौंदर्य होय ! या सर्वांपाशीं जी सहजमनोहरता आणि निष्पापता असते तीच बालकांजवळही असते. खरोखरीं पाहतां, शैशवावस्थेंत मुलांचें निसर्गनिर्मित पदार्थांशींच अधिक साम्य असतें. पुढें तीं, जसजशीं मोठीं होत जातात तसतशीं, निसर्गापासून लांब लांब जाऊन इतर मनुष्यां-सारखीं बनतात. प्रौढावस्थेंत सहसा न सांपडणारी निष्पापता बालकांचे ठिकाणीं नेहमींच आढळून येते आणि बालकांच्या ज्ञानवृद्धीबरोबर या गुणाचा लोप होत जातो. म्हणजे, अज्ञान हेंच त्या गुणांना पोषक झालेलें असतें. आंग्लकवि **शेले** यानें चंडोल पक्ष्याविषयीं

" Shadow of annoyance
Never came near thee "

( दुःखाच्या छायेचा तुला कधीं स्पर्शही झालेला नाहीं ) असें जें म्हटलें आहे किंवा **केशवसुतांनीं** फुलपांखराला उद्देशून

" असे यास कां चिंता कांहीं ?
यास ' उद्या 'चा विचार नाहीं. "

असें म्हटलें आहे तें बालकाविषयींही खरें आहे.

पण, या अज्ञानामुळेंच तर बालकांना निर्भेळ आनंदरसाचा आस्वाद घेतां येतो. मग, असें असतां, **ग्रे** कवीप्रमाणें

" Thought would destroy their paradise;
......Where ignorance is bliss,
' Tis folly to be wise. "

( विचारांमुळें त्यांच्या स्वर्गीयसुखाचा नाश होईल. अज्ञानामुळेंच आनंद मिळत असतां, ज्ञानाची हांव धरणें मूर्खपणाचें आहे ) असें म्हटल्यास, त्यांत विशेष तें काय बिघडलें ? आणि असल्या आनंदाकडे बघून, ज्ञानवृद्ध आणि दुःखवृद्ध कवीनें आशाव्याकुल चित्तानें "रम्य तें बालपण देईं देवा फिरूनि"

अशी करुणा भाकली तर, त्यांत आश्चर्य तें काय? आपलें रम्य बालपण आठवून **वर्डस्वर्थ** म्हणतो,

> "There was a time when......
> .........Every common sight,
> To me did seem
> Apparelled in celestial light,
> The glory and the freshness of a dream"

(माझ्या आयुष्यांत अशी एक वेळ होती कीं, ज्यावेळीं माझ्या दृष्टीला प्रत्येक वस्तू दिव्यसौंदर्ययुक्त आणि स्वप्नाप्रमाणेंच नाविन्यपूर्ण व रम्य भासत असे.) पण अनुभवाचीं शल्यें बोंचून घायाळ झालेल्या हृदयाला जिकडे तिकडे असा मनोरम देखावा कसा दिसणार? वर्डस्वर्थ हळहळून म्हणतो कीं, बालपणीं जशी सृष्टि होती तशीच आतांही आहे पण ......

> "But yet I know, where'er I go,
> That there hath past away
> a glory from the earth"

(पण आतां जिकडे जावें तिकडे जगांतील रम्यपणांत कांहींतरी कमतरता आल्याचें मला आढळून येतें)

अशी स्थिति झाली असतां, रानावनांतून दिवसभर चालून चालून दमलेल्या प्रवाशाला, रात्र पडली तरी, मनुष्यवस्तीचें चिन्ह नाहींसें पाहूनसुद्धां आपल्याला कुठेंच विश्रांतिस्थान मिळणार नाहीं काय अशा भीतीनें व्यापलेलें असतां, जरा पुढें गेल्याबरोबर एकाद्या दिव्याचा प्रकाश दिसून जसा आनंद होईल आणि त्याच्या नेत्रांना तो प्रकाश जसा आकर्षून घेईल तसाच आनंद, या कण्टकमय जगाचा प्रवास करतां करतां गांजलेल्या आणि सुखाविषयीं निराश पावलेल्या कवीला बालकाकडे पाहून होतो. पापें पाहून विटलेल्या त्याच्या मनाला बालक निसर्गाप्रमाणेंच सहज आपल्याकडे ओढून घेतें.

जेथें मनुष्याचा वासदेखील नाहीं तेथेंच आनंदाआनंद असतो असें म्हण-

णाऱ्या बायरनसारख्या मनुष्यद्वेष्ट्यालामुद्धां बालकें आनंदवीत असत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्यानें आपल्या चाइल्ड हॅरल्डविषयीं म्हटलेलें त्याला स्वतःला पूर्णपणें लागूं पडलें असतें.

" And he had learned to love,
The helpless looks of blooming infancy,
Even in its earliest nurture "

परंतु, जगाच्या बाजारांत कोठेंहि न मिळणारा आनंदाचा अमोल ठेवा, सूर्यप्रकाशाप्रमाणेंच, आपण सज्जनदुर्जनांना सारखाच लुटीत आहों याची त्या बिचाऱ्यांना जाणीवही नसते. असली ही स्वर्गीय वृत्ती बालकांजवळ आली तरी कुठून ? साधुसंतांनासुद्धां दुःसाध्य अशी ही स्वर्गीय संपत्ति जन्मल्याबरोबर त्यांच्या संग्रहीं कशी आली ? मनुष्यांजवळून खास नव्हे ! मग, हें गहन गूढ आहे तरी काय ?

तेंच गहन गूढ उकलण्यासाठीं कवी आजवर आटोकाट प्रयत्न करीत आले आहेत. अगदीं बाल्यावस्थेंतील स्मृति कोणालाच नसल्यामुळें, या शोधासाठीं लंगड्या कल्पनेलाच पाठविणें प्राप्त होतें. कवी आपल्या कल्पनांना स्वैरसंचार करूं देऊन, आपापल्या मताप्रमाणें त्याचा निश्चित अर्थ काढण्याचा प्रयत्न करतात. तरी शेवटीं, गूढांतील गूढ अशा त्या परमेश्वराकडे बोट दाखवूनच त्यांना स्वस्थ बसावें लागतें.

वर्डस्वर्थचें म्हणणें असें आहेः—

" The soul that rises with us,
..........................................
.........Cometh from afar:
Not in entire forgetfulness,
But trailing clouds of glory
do we come
From God who is our home:
Heaven lies about us in our infancy !
Shades of the prison-house begin to close
Upon the growing boy "

( आपला आत्मा परमेश्वराजवळून आपली विजयपताका फडकवीतच येतो. त्याला पूर्वस्मृति असते. प्रथम बालकाला स्वर्गवासाचा अनुभव मिळतो परंतु तें जसजसें मोठें होतें तसतसें कैदेंत पडल्याप्रमाणें होतें. )

टागोरांचीही अशीच कल्पना आहे. त्यांनीं लिहिलें आहे, "If baby only wanted to, he conld fly up to heaven this moment." (बालकानें मनांत आणलें तर, त्याला केव्हांच स्वर्गलोकीं उडून जातां येईल.) पण, आपल्या अस्तित्वाविषयीं लोकांची खात्री करून देऊन, निष्पापतेवरच सर्व सुख अवलंबून आहे असें दाखविण्याकरितांच जणूं परमेश्वर बालकांना पाठवतो आणि प्रथम ते उत्साही देवदूत आपलें काम यथाशक्ति बजावीत असतात. परंतु, पुढें त्यांचीच अवस्था काय बरें होते ? त्या दीनदयाळ परमेश्वरानें स्वाधीन केलेली सुखसंपत्ति ते हरवून बसतात. आपल्या शुद्ध आत्म्याची त्यांना ओळखही पटेनाशी होते.

"He whom I enclose with my name is weeping in this dungeon. I am ever busy building this wall all around; and...... I lose sight of my true being."

( माझ्या आत्म्याभोंवतीं मी तुरुंग घातल्यामुळें तो रडत बसला आहे. माझें खरें स्वरूप मला दिसेनासें झालें आहे. )

मग दुःखांनीं तळमळत असतां, मनुष्याला ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं देखील शंका येऊं लागते ! पण अशा वेळीं बालकाकडे पाहून आपणही पूर्वी असेंच निष्पाप आणि सुखी होतों अशी त्याला जाणीव होऊं लागते.

ही जाणीव सदोदित मनांत ठेऊन जर सर्वांनीं बालकाला शिकविलें तर किती उत्तम होईल ! आपल्या भोंवतालच्या मनुष्यांकडे पाहूनच, तीं त्यांच्याप्रमाणें बनण्याचा प्रयत्न करीत असतात. म्हणजे, त्यांना सुखी किंवा दुःखी करणें हें भोंवतालच्या माणसांच्या आणि विशेषतः आईच्या हातीं असतें. म्हणून, ज्यांना पूर्वपुण्याईमुळें बालकें लाभतात त्यांना टागोरांच्याच शब्दांत विनंति आहे कीं,

" Bless this little heart, this white soul that has won the kiss of heaven for our earth.........He has come into this land of a hundred crossroads.........He will follow you, laughing and talking, and not a doubt in his heart. Keep his trust, lead him straight and bless him." ( या निष्पाप बाळाला आशीर्वाद द्या. वांकड्यातिकड्या शेंकडों वाटा असलेल्या या जगांत तें निःशंक मनानें हंसत खिदळत तुमच्यामागें येईल तेव्हां त्याचा विश्वासघात करूं नका तर, त्याला योग्य मार्ग दाखवा. )

---

## स्त्रीशिक्षणाची दिशा : : ३

एखाद्या गृहस्थानें परमार्थसाधनाच्या हेतूनें सहस्रभोजनें सुरूं केलीं कीं पोटार्थी भटाभिक्षुकांची धांवपळ सुरूं होते. क्षुधाशमनासाठीं ते सर्व हपापल्याप्रमाणें झाले असल्यामुळें चांगल्या वाईटांचा विचार त्यांना नसतो. कसलेंतरी बरेंवाईट जेवण मिळून पोट भरलें कीं त्यांत त्यांचें समाधान असतें. पुन्हां सहस्रभोजनांत गोडधोड कांहींतरी असतेंच आणि शिवाय दक्षिणा वर! अगदीं अशीच सध्यां आमची गत झालेली आहे. इंग्रजांनीं हिंदुस्थानांत शिक्षणसंस्था उघडल्या आणि शिक्षणार्थी स्त्रीपुरुषांची त्यामध्यें दाटी होऊन गेली. ज्ञानसंपादन आणि पुढें नोकरीची आशा. प्रथम उच्चशिक्षण घेतलेल्या लोकांना मानसन्मान आणि पैसा यांचा चांगला लाभ झाला. तें बघून ज्ञानसंपादनापेक्षांही नोकरीच्याच आशेनें बहुतेक लोक शिक्षण घेऊं लागले. आणि अती झाल्यामुळें सर्व माती होऊन शेकडों लोक शिक्षण घेऊनही बेकार राहूं लागले आहेत.

सहस्रभोजनांत फुकट जेवावयाचें असल्यामुळें अन्नाच्या चांगलें वाईट-

पणाचा विचार अयोग्य ठरेल. उपाशीपोटीं वाईट अन्न गोड करून घेण्यांतच हित असतें. प्रथम लोकांनीं जें शिक्षण मिळालें तें घेतलें. अडीअडचणीच्या प्रसंगीं खाणावळींत मनुष्य जेवला तर त्यांत अयोग्य कांहींच नाहीं. पण पैसे भरून उपाशी रहावें लागलें तर पैसे देण्यांत शहाणपणा काय?

उच्चशिक्षणासाठीं वाटेल तितका पैसा ओतूनही पोटाचें साधन मिळत नाहींच. ही परिस्थिति पुरुषांची झालेली आहे. असें असूनही स्त्रिया त्यांचाच कित्ता गिरवीत आहेत यांत काय बरं अर्थ आहे ? सध्यां स्त्रियांना जें उच्च शिक्षण मिळत आहे ते अगदीं अयोग्य आहे हें अनुभवानें कळून आल्यावरही मुलींना योग्य शिक्षण देण्यासाठीं समाजानें खटपट करूं नये काय?

केवळ ज्ञानार्जनासाठीं उच्च शिक्षण घेणारे पुरुष जसे क्वचित् तशाच स्त्रियाही क्वचितच. नोकरी किंवा योग्य स्थळ हे दोन हेतू त्या शिक्षणांत प्रामुख्यानें असतात. आणि विचार करतां हे दोन्ही हेतू सध्यांच्या शिक्षणानें सफळ होत नाहींत. सध्यां जरी मुलींना नोकऱ्या मिळत असल्या तरी उच्चशिक्षित मुलींची संख्या वाढली कीं पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांतही बेकारी वाढेल हें उघड आहे. याकरतां सगळ्यांनीं एकजात उच्चशिक्षण न घेतां वेगळ्या वेगळ्या धंद्यांचें शिक्षण घेतलें तर तें इष्टच होय.

सध्यांचा एकसुरी शिक्षणक्रम बदलून त्यांत योग्य त्या सुधारणा घडवून आणण्याची वेळ येऊन ठेपलेली आहे. डोळेझांक करून चाललें आहें तें चालूं दे, असें म्हणून कांहीं फायदा नाहीं.

या हेतूला पोषक अशा योग्य शिक्षणसंस्था नाहींत हें खरें आहे. पण मागणी आली कीं पुरवठा होतोच. पुण्याच्या एका कॉलेजाचीं सहा कॉलेजें झालींच कीं नाहीं? गोम आहे ती इथेंच कीं, चाकोरींतून बाहेर पडण्याची कुणाची कुवत नाहीं.

इंग्रजी पांचसहा इयत्तांपर्यंत सध्यां आहे हा शिक्षणक्रम बरा आहे त्यांतहि फेरबदल हवाच आहे. पण तो विषय अप्रस्तुत आहे.

यानंतर मुलींना कोणतें शिक्षण द्यावें हा प्रश्न महत्त्वाचा आहे.

ज्यांना ज्ञानाकरतां शिकावयाचें असतें त्यांच्याविषयीं विचार करण्याची जरूरी नाहीं.

ज्या बहुसंख्याक मुलींना लग्न करावयाचीं असतात, त्यांच्या शिक्षणाची योग्य दिशा आंखणें मात्र अत्यावश्यक आहे.

कुटुंबसंस्था अत्युच्च दर्जाला न्यावयाची तर मुलींना गृहिणीपद यथायोग्य रीतीनें भूषवितां येईल असें शिक्षण मिळालें पाहिजे. माता शरिरानें सुदृढ तशीच मनानेंही सुदृढ आणि संसारोपयोगी कलांनीं युक्त अशी असली पाहिजे.

मुलींच्या प्राथमिक शिक्षणांत शिवणकला, गायनवादन, चित्रकला वगैरेंना महत्त्व असावें. पंधरा सोळा वर्षांपर्यंत प्राथमिक शिक्षण संपलें म्हणजे पुढें सोयीप्रमाणें दोन किंवा तीन वर्षांचा कोर्स करून मुलींना संसारोपयोगी शिक्षण, नार्सिंग, मिडवाइफरी हे विषय व शिवाय एकादा चरितार्थाचा धंदा शिकवावा.

स्त्रियांची आर्थिक परिस्थिति जोंपर्यंत समाधानकारक नाहीं तोंपर्यंत त्यांनीं चरितार्थाकरतां आवडीप्रमाणें एकादा धंदा शिकून ठेवावा हें योग्यच होय.

गृहिणीपद आणि चरितार्थाचा धंदा करणें या दोन गोष्टी विसंवादी आहेत. सुस्थितींतील गृहिणींनीं नोकरीधंदा करून कालापव्यय करूं नये हें योग्य परंतु अडीअडचणीच्या प्रसंगीं तिची असहाय स्थिति होऊं नये म्हणून तिनें लग्नाच्या आधींच चरितार्थसाधनाची सामुग्री मिळवून ठेवावी.

स्त्रियांच्या नाजूक शरीरमनाला अनुकूल असे कितीतरी धंदे आहेत. पुरुषांशीं स्पर्धा न करतां त्यांना चरितार्थसाधन करतां येईल यांत मुळींच शंका नाहीं.

सध्यांच्या कॉलेजशिक्षणानें मुलींच्या विवाहाचा काल फारच लांबतो. मुलींची विवाहमर्यादा अठरा ते बावीस असावी हें उचित.

विवाहकाल लांबला कीं मुलींची मानसिक सुदृढता टिकत नाहीं. यथायोग्य

व्यायामाच्या अभावीं व कठीण, शुष्क शिक्षणक्रमामुळें शारीरिक हानीही होते. डोईजड ज्ञान मिळवलें; त्याचा स्वतःला व समाजाला उपयोग करून देऊन त्यापासून आनंदलाभ करून घेण्याइतकीही शक्ति त्यांना रहात नाहीं. अनभ्यस्ततेमुळें सांसारिक गोष्टींबद्दल भीति व तुच्छता वाटूं लागते. कुटुंबसंस्थेला ही परिस्थिति अगदीं घातक आहे.

म्हणून सर्व बाजूंनीं यथायोग्य विचार करून समाजानें सध्यांचा शिक्षणक्रम बदलून योग्य त्या सुधारणा लवकर घडवून आणल्यास अतिशय फायदेशीर होणार आहे.

---

## स्त्रीशिक्षणविषयक योजना. : : ४

(हा लेख "सूर्यकांत" मासिकाच्या आक्टोबर—नोव्हेंबर जोडअंकांत सन १९३२ मध्यें प्रसिद्ध झाला. लेखांतील पहिला थोडा भाग या संग्रहांत गाळलेला आहे.

गाळलेल्या भागांत मालविकेनें बिगर इयत्तेपासून बी. ए. होईपर्यंतचे आपले भलेबुरे अनुभव सांगितलेले आहेत. शाळाकॉलेजांतील निवळ बुद्धिपोषक शिक्षण घेऊन मालविकेनें बी. ए. ची पदवी मिळवली. इतकें होईपर्येत चरकांतून निघाल्याप्रमाणें शारीरिक आणि मानसिकदृष्ट्या ती दुर्बल बनली. पुढें काय असा प्रश्न तिला आणि तिच्या मातापितरांना पडला. यापुढील कथाभाग संग्रहांत पुनर्मुद्रित केला आहे.)

आतां माझें लग्न करावें असें आईबाबांनीं ठरवून टाकलें. त्यांची आणि माझीही स्थिति चमत्कारिक झाली. त्यानीं स्वतःच ठरवावें तर मी मोठी झालें असल्यानें तें योग्य नव्हतें. बरं माझ्या विचारानें सर्व करावें तर मला लाज वाटूं लागली. स्वतः लग्न जमविण्याला तशी परिस्थितीही नव्हती.

विवाहयोग्य पुरुषांची ओळख घडून येण्याजोगे कधीं प्रसंगच आले नव्हते. अरं पूर्वापार पद्धतीनें वधूपरीक्षेला मान वाकवणेंही कमीपणाचें वाटूं लागलें. पण करणार काय ? मग वधूपरीक्षेत कांहीं आधुनिक रीतिरिवाजांची भर घालून मला दाखवायला सुरवात झाली. पण गंमत ही कीं मॅट्रिकमध्यें मला जीं स्थळें मिळालीं असतीं तशीं आतां दिसेनात. मॅट्रिकमधील मुलीला उत्तम स्थळ मिळतें, प्रीव्हिअसमधील किंवा इंटरमधील मुलीलाही चांगलें स्थळ मिळूं शकतें. परंतु एकदां बी. ए. चा शिक्कामोर्तब बसला कीं चांगलें स्थळ मिळणें कठीण होऊन बसतें. आमची किंमत ज्ञानानें वाढते पण लग्नाच्या बाजारांत ती कमी ठरते.

मी आजपर्यंत सुस्थितींत वाढलें असल्यानें गरीब स्थळ रुचेना. नुकताच पास झालेला मुलगा धंदा किंवा नोकरी करूं लागून पैसे मिळवीपर्यंत फार काळ लोटतो. तोंपर्यंत काय नोकरी करायची की सुनबाई म्हणून सासरीं पारतंत्र्यांत दिवस घालवायचे ? छेः या दोन्हीं गोष्टी मला रुचेनात.

बरं बड्या परीक्षा पास होऊन मोठ्या हुद्याची नोकरी मिळालेले लोक जबरदस्त हुंडा मागूं लागले. म्हणून त्या स्थळांचा मार्ग बंद झाला.

आतां राहिले त्यांच्या खालोखाल पैसे मिळवणारे. पण यांचीं लग्नें आधींच झालेलीं असतात. मुलींचें लग्नाचें वय वाढलें पण मुलांचे मात्र पूर्वीच्याच वयाला म्हणजे पंचवीस ते तीसपर्यंतच लग्न होतें.

तेव्हां उरले काय ते बिजवर. पण त्यांना तरी बी. ए. बायको कुठें हवी असते ?

दोघांनीं मी शिकलेली म्हणूनच मला नाकारली. दोघांनीं मला नाकारलें ते कॉलेजांत माझ्याविषयीं उठलेल्या घाणेरड्या अफवा ऐकून नाकारलें असें मला मागून कळलें.

शेवटीं एका पस्तीस वर्षांच्या दोनशें रुपये पगारदार बिजवरानें मला पसंत केलें. ( पुढें मी यांचें नांव थट्टेनें अग्निमित्र असें ठेवलें. त्याच नांवानें त्यांच्याविषयीं यापुढें उल्लेख करीन. )

अग्निमित्रांचें लग्न वयाच्या पंचविसाव्या वर्षी झालें असून त्यांची पत्नी एक वर्षापूर्वीच निवर्तली होती. अग्निमित्रांनीं मला पसंत केली यांत माझ्या बी. ए. चा कांहीं एक संबंध नसून, मध्यावर आलेल्या संसारांत एकाद्या लहान मुलीला लुडबुड करूं देण्यापेक्षां पोक्तशी बाई बरी असाच विचार होता.

आईवडिलांनीं माझ्या संमतीनें हें स्थळ कायम केलें. साध्यासुध्या रीतीनें लग्न होऊन मी पतीसमवेत नोकरीच्या गांवीं गृहप्रवेश केला.

मला प्रथम कोण हुरूप आला होता! पण अग्निमित्रांनीं आधींच संसार-सुखाचा आस्वाद घेतलेला असल्यामुळें त्यांना मोठासा हुरूप येण्याचें कारणच नव्हतें. त्यांनीं मध्यें थोडें दिवस रिकामें पडलेलें गृहिणीपद मला दिलें आणि ते दैनिक कार्यक्रमांत गढून गेले.

रुक्मिणी गौळीवाड्यांत गेली, स्वतः गवळण बनून तिनें गाणें म्हणून गाईही गोळा केल्या. पण तिला दूध कुठें काढतां येत होतें?

मी संसारांत प्रविष्ट होऊन गृहिणी झालें पण मला संसारसूत्रें आवरण्याचें ज्ञान कुठें होतें? मी गृहिणीपद संभाळायला कधीं शिकले होते! आईनें तर कॉलेजांत जाणारी मुलगी म्हणून मला इकडली काडी तिकडे करूं दिली नव्हती. आणि मला घरकामाची आवडही नव्हती.

मला स्वैपाक मुळींच येत नव्हता. तेव्हां स्वैपाकाला बाई ठेवणें अगत्याचें होतें. बाई ठेविली, आणखीही दोन नोकर ठेवले, आणि माझ्या संसाराला सुरवात झाली. पण मग मला कामच राहिलें नाहीं. दिवसभर अग्निमित्र कामावर जात. मला सारखें वाचीत बसण्याचा कंटाळा येऊं लागला. तेव्हां मी नोकरी करण्याचा बेत केला आणि अग्निमित्र विरुद्ध असतांना तो अंमलांतही आणला.

सर्व संसार नोकरांवरच पडला. मला तिकडे लक्ष घालायला फुरसतही नव्हती आणि इच्छाही नव्हती. कांहींतरी कसेंतरी चाललें होतें झालें. पुढें मला नोकरीचाही कंटाळा येऊं लागला. संसारांतही मन रमेना. कुठून या लग्नाच्या फंदांत पडलें असें मला होऊन गेलें. मन अगदीं बावचळल्यासारखें

झालें, वैतागांतच मी नौकरीचा राजीनामा खरडून टाकला. तो लवकरच मंजूरही झाला.

तेव्हां अग्निमित्र विनोदानें म्हणाले, "चैन आहे बुवा तुम्हां बायकांची."

मी जरा आश्चर्यानेंच विचारलें, "ती कशी बाई ?"

अग्निमित्र जरा खोचिकपणानें हसत म्हणाले, "घरकामाचा कंटाळा आला म्हणून तें नोकरांवर सोपवलें आणि नोकरीचा कंटाळा आला तेव्हां तीही सोडून दिलीस. आतां मलाही नोकरीचा कंटाळा आला आहे. मग सोडूं कां नोकरी ?"

मी काय यावर उत्तर देणार ? पण हळूंहळूं घरकामांत मी लक्ष घालूं लागलें. माझ्या शिक्षणाचा येवढा मात्र फायदा झाला कीं मला तें लवकरच साधलें. स्वैपाकही मला उत्तम करतां येऊं लागला. संवयीनें घरकामाचा मला बाऊ वाटेनासा झाला. उलट त्यांत हौसच वाटूं लागली.

पण देवानें जणुं कांहीं माझें सत्वच पहायचें ठरवलें होतें. आतां दुसरीच एक काळजी माझ्यापुढें उभी राहिली. गृहकृत्यांत मी अनभिज्ञ होतें आणि गरोदरपणांत कसें वागायचें आणि काय करायचें हें तरी कुठें मला माहीत होतें ! बरं घरांत वडीलधारें मनुष्य नसल्यामुळें मला सांगणार तरी कोण ? तेव्हां मी पुन्हां पुस्तकांचा आश्रय घेतला. या विषयावरील मी बरीच पुस्तकें वाचलीं.

शरीरप्रकृति अशक्त झालेली असल्यामुळें मला अतिशय त्रास झाला. बाळंतपणांत जवळजवळ माझी गच्छंतीचीच वेळ आली होती. आई आजारी असल्यामुळें मी इस्पितळांत गेलें होतें. मुलगी अतिशय अशक्त होती. गोंडस, सशक्त मुलांची मला कोण हौस ! पण माझ्या मुलीकडे पाहून मला धक्काच बसला. तिला दूधहि अंगावर मिळेना. ग्लॅक्सोवरच तिचें जीवन अवलंबून ठेवावें लागलें.

माझ्या अशक्तपणामुळें घरीं आल्यावर लिलीला संभाळायला दाई ठेवली होती. पुढें मी बरी झालें तरी दाईला काढली नाहीं. कारण मला सारखें

लिलीचें करण्याचा कंटाळाच वाटे. शिवाय लिली सारखी आजारी पडे आणि किरकिर करी.

शेवटीं चार्च महिन्यांनीं ती गेली. त्यावेळीं मला ब्रह्मांड आठवलें. लिलीची किंमत ती गेल्यावर मला कळली. तिचें सर्व मी दाईकडे सोपवून दिलें म्हणूनच ती गेली अशा समजुतीनें मी मला फार दोष लावून घेतला. माझ्या विचारांची दिशा साफ बदलून गेली.

आणि याचा फायदा घेऊन अग्निमित्रांनीं मला स्त्रीजीवनविषयक, मोटमोठ्या इंग्रजी ग्रंथकारांचीं पुस्तकें वाचावयाला आणून दिलीं. तीं पुस्तकें मी वाचलीं तेव्हां माझ्या डोक्यांत प्रकाश पडला.

झाड लावायचें केळीचें आणि त्यापासून अपेक्षा करायची आंब्याची तसेंच माझें शिक्षण झालें नाहीं काय ? पुरुषी शिक्षण घेऊन मी गृहिणीपद आणि मातृपद सांभाळायला पहात होतें. कसें बरें जमावें तें ?

या विषयावर आमचें दोघांचें एकदां बोलणें चाललें होतें. त्यावेळीं अग्निमित्र म्हणाले, “ अग, सध्यांचें हें शिक्षण आम्हां पुरुषांनादेखील अयोग्य आहे. मास्तर, डॉक्टर आणि वकील येवढे काय ते आम्हांला माहीत. सर्व धंदे गेलेले अशिक्षितांच्या हातीं. धंद्याला उच्च दर्जा प्राप्त करून देण्याला ते असमर्थ असतात. इतकेंच नाहीं तर पोटापुरतें मिळालें कीं अधिक द्रव्यार्जन करण्याची त्यांना इच्छाच होत नाहीं. म्हणून धंद्यांना हीन कळा आली आहे. बरं आमच्याकडे पहावें तर नोकरीशिवाय आम्हांला कांहींच साधन नाहीं. कोणत्याही धंद्याचें आम्हांला ज्ञान नाहीं. तो चालविण्याचें चातुर्य नाहीं आणि पडझड सोसण्याची धमक नाहीं. त्यामुळें दोन तीन ठराविक पेशाचे नोकर तयार होऊन नोकऱ्या मिळण्याची किंवा वकिली अगर डॉक्टरी चालण्याची मारामार पडूं लागली आहे.

आणि त्या गर्दींत तुम्ही बायका आतां शिरूं लागलां आहां. आतांचेंच जर वाढतें मान कायम राहिलें तर पाश्चात्य देशांप्रमाणें प्रत्येक बाबतींत तुम्ही आमच्याशीं चढाओढीला उभ्या रहाल.

घोड्याला झेंडूच्या माळांनीं नटवतात त्याऐवजीं त्याला गुलाबाच्या फुलांच्या माळा घातल्या तर त्यांचा अर्धा तास तरी टिकाव लागेल कां? एकदां घोडा खिंकाळला तरी त्याच्या हादरण्यानेंच फुलांच्या पाकळ्या पडून जातील.

आमचें कर्तव्यक्षेत्र कठोर आहे. तुम्ही बायका मनानें तशाच शरीरानेंही आमच्यापेक्षां नाजूक आहां. गुलाबाच्या फुलानें जसें नाजूकपणाबद्दल वैषम्य वाटून घेणें किंवा आपल्या अंगीं नाजूकपणा मुळींच नाहीं असें म्हणूं पहाणें किंवा नाजूकपणाबद्दल सृष्टिकर्त्याला दोष देणें वेडेपणाचें ठरेल, तसेंच तुम्हीही आपला नाजूकपणा नाकबूल करूं लागलां किंवा आम्ही नाजूक नाहींच असें म्हणूं लागलां तर तें वेडेपणाचें ठरेल.

पण मी म्हणतों त्या नाजूकपणाबद्दल वैषम्य वाटून घेण्याचें कारणच काय? नाजूकपणामुळें तुमचें कर्तव्यक्षेत्र कमी प्रतीचें थोडेंच ठरतें? मालू, कविबिवि म्हणून चेष्टा नको हं करूं. पुन्हां गुलाबाचें फूलच घेतों उपमेसाठीं. गुलाबाचें फूल नाजूक असतें. आपल्या सौंदर्यानें आणि सुवासानें तें नेहमीं आल्हाद देतें. तसेंच स्वर्गीय स्वार्थत्याग करून, स्वतः नाश पावून तें अत्तर देतें. हें झेंडूच्या फुलाला साधेल कां? मग इतकेंच तुम्हां स्त्रियांचेंही कर्तव्यक्षेत्र श्रेष्ठ दर्जाचें असतां तुम्हीं तें हलकें कां लेखावें?

देहापेक्षां मन श्रेष्ठ आहे हें तुला कबूलच आहे. आम्ही पुरुष पैसा मिळवून काय करतों? केवळ कुटुंबांतील मंडळींच्या देहांचें पोषण करतों. पण तुम्हां स्त्रियांकडे मनाची जोपासना करण्याचें कार्य दिलेलें असतें. तुमचें कर्तव्य आमच्यापेक्षां कितीतरी पटीनीं श्रेष्ठ आहे. अधःपतन सोपें असतें पण उच्चपद अप्राप्य असतें. तुम्ही आमच्यासारख्या नोकऱ्या करून पैसे मिळवाल पण आम्हांला तुमच्या कर्तव्यक्षेत्रांत पाऊल टाकायची योग्यता कधींही यायची नाहीं. तुम्हीं आमच्या क्षेत्रांत घोटाळा घालायला आलांत तर तुमचें क्षेत्र रिकामें पडेल. मग सर्व कुटुंबसंस्थेचा नाश होईल. आणि त्याबरोबर राष्ट्राचेंही घोर नुकसान होईल. पाश्चात्य देशांत चाललेले घोटाळे दिसत असतां आपण त्यांच्यासारखेंच वागूं पहायचें यांत शहाणपण काय आहे? पुढच्याला ठेंच

लागली तर मागल्यानें शहाणपण नको कां मिळवायला ? कां आपणही ठेंचळायचं ?

पुन्हां आमचेंही उदाहरण तुमच्या डोळ्यांसमोर आहे. सध्यांचें शिक्षण इंग्रजीच्या मध्ये लुडबुडण्यानें चौपट त्रासदायक झालें आहे. त्यांत धंदेशिक्षण नाहीं आणि शारीरिक सामर्थ्य वाढण्याचीही आशा नाहीं. बुद्धीची वाढ फार आणि शरीरानें काडीपैलवान असे, आम्ही धडधाकट पुरुषदेखील होऊन जातों मग तुमची तर काय कथा ? पण या शिक्षणानें आम्हांला नोकरी तरी मिळते. तुमचें तसें कांहींच नाहीं; आतां तुझीच गोष्ट पहा. मालु, लग्न करायचें असें तुझें पहिल्यापासून ठरलेलें होतें. असें असतां गृहशिक्षण घेण्याऐवजीं तूं पुरुषी शिक्षण घेऊं लागलीस. बाकी हा तुझा किंवा तुझ्या आईबापांचा दोष म्हण-ण्यापेक्षां स्त्रियांना योग्य अशा शिक्षणसंस्थेचा अभाव हेंच त्यांचें कारण धरलें असतां कांहीं चुकीचें ठरणार नाहीं. आतां तशा एक दोन संस्था आहेत पण त्यांत कांही अर्थ नाहीं. अर्धनारी नटेश्वराप्रमाणें धड पुरुषी नाहीं आणि धड बायकी नाहीं असें त्या संस्थांत शिक्षण आहे. तेव्हा त्यांविषयीं विचारच नको.

तूं बी. ए. झालीस, काय मिळवलेंस ? तूं ज्ञानसंपन्न झालीस पण त्यासाठीं तूं केवढा तरी दैहिक आणि मानसिक यज्ञ केलास ? सहशिक्षणामुळें, कठीण अभ्यासामुळें आणि परीक्षांच्या काळजीमुळें, तुझा मानसिक ऱ्हास फार झाला. सुदृढता कशी ती तुझ्या ठिकाणीं राह्यलीच नाहीं.

तूं बी. ए. झालीस तेव्हां तूं पंचवीस वर्षांची होतीस. नंतर तुझ्या लग्नाची वाटाघाट सुरू झाली.

वास्तविक तुम्हां मुलींचें लग्नाचें वय अठरापासून बावीसतेवीस वर्षांपर्यंत असतें. पण पंचविसांपर्यंत कांही तशी हरकत नाहीं म्हणा. तुझें लग्न लवकर जमलें पण कांहींचें न जमल्यामुळें त्या तशाच तीसतीस वर्षांपर्यंत लग्नाच्या रहातात. आपलें लग्न झालें. माझें ठीक झालें, पण तुझें वय वाढल्यामुळेंच केवळ तुला माझ्यासारखा बिजवर पतकरावा लागला.

आपला संसार सुरू झाला. पण गृहव्यवस्थेचें ज्ञान तुला नसल्यामुळें

नोकरांच्या हातीं सर्व कांहीं देणें अपरिहार्य होतें. पण तूं फार शिकलेली, तर नोकर पार अडाणी. त्यांचें अस्वच्छ, अव्यवस्थित काम तुला पटेना. बरें तुला त्यांना कांहीं शिकवितांही येईना. चांगली पोळी तुला करतां आली तर तूं शिकवणार की नाहीं? अशा परिस्थितीत आपल्याशिवाय यांचें कांही चालत नाही असें लक्षांत आलें कीं नोकर उद्दाम बनतात. तुझें तर मन अती हळुवार होऊन गेलेलें. त्यामुळे तुला प्रत्येक बारीकसारीक गोष्टींतसुद्धां अतोनात त्रास होऊं लागला. नोकर घरांत ठेवल्यानें आपला संसार महाग होऊन त्या मानानें सुखनिष्पत्ति तर होईना. त्यांतच तूं पहिल्यानें आणखी नोकरीचाही उपद्व्याप करीत होतीस. पण लवकरच तुझ्या डोक्यात सुविचार येऊन तूं नोकरी सोडून दिलीस.

तूं गृहव्यवस्था पाहूं लागलीस. तुला त्यातली तत्त्वें तावडतोब आकलन करता आली, त्यांत हौसहि वाटूं लागली आहे. पण संवय नसल्यामुळे तुला त्यात त्रास मात्र फार होतो. काम तूं चांगलें करतेस पण मागून तुला कांहींच हुरूप रहात नाही. याचें कारण तुझी शारीरिक आणि मानसिक दुर्बलता. त्याच तुझ्या सिंधुताई. तुझ्यापेक्षां पांच वर्षांनीं वडील असून त्याना पाच मुलें आहेत. त्यांची आणि त्यांच्या मुलांची प्रकृती कशी सशक्त आहे. घरचें काम-धाम, व मुलांचें सर्व व्यवस्थित करून पुन्हां आपल्या संध्याकाळीं व्याख्या-नाला, किंवा दुसरीकडे कुठें बाहेर जायला तयार. संसाराचा आनंद जणुं त्या लुटीत आहेत. त्यांच्यांवरही दुःखांचे प्रसंग आले नाहींत असें नाही. पण मन धीराचें असल्यामुळे अळवावरल्या थेंबासारखीं त्यांनीं तीं दुःखें बाजूला सारलीं. संसारांत हे असेंच सुदृढ मन लागतें. तरच त्यांतील आनंद चाखतां येतो.

पण तूं इतकी दुर्बल झालेली आहेस कीं येवढ्याशा काळजीनें तूं त्रासून जातेस आणि सुखाचा उपभोग घेण्याइतकी तुला उमेदच रहात नाहीं. नोक-रींत असलेल्या शिकलेल्या मुलींचीही हीच गत आहे. कुठें जाणें नाहीं, येणें नाहीं सदा आंबलेल्या आणि विटलेल्या अशा तुम्ही समाजसुधारणा कशी

करणार ? बरं तुमचें शिक्षण असें गुलदस्तांत राहिलें तर तुमच्या शिक्षणा-विषयीं लोकांना तरी अनादर कां वाटूं नये ?

शाळेंत शिकवणें म्हणजेच समाजसेवा करणें असें कांहीं जणी समजतात, पण मग आम्ही नोकरी करतों त्यालाही समाजसेवा असें सुंदर नांव कां देऊं नये ? "

" पण सगळ्यांनाच कशी समाजसेवा करतां येईल ? "

" नाहींच येणार. " अग्निमित्र हंसन म्हणाले. " मी तरी कुठें म्हणतों येईल म्हणून ? पण मग उगीच आम्ही समाजसुधारणा करतों असा डौल करूं नये. बाकी हें राहिलं. पण समाजसेवा म्हणजे कांहींतरी अलौकिक गोष्ट अशी जी तुम्ही समजूत करून घेतलेली दिसते तीच मुळांत चुकीची आहे. समाजाची सुव्यवस्था ठेवणें ही तरी समाजसेवा नव्हे का ? कुटुंब हे समाजाचें एक घटक आहे. कुटुंबाचें दैहिक भरणपोषण करणें आणि मानसिक भरणपोषण करणें हीं दोन्हींही समाजसेवा याच्र सदरांत येतात. म्हणजे पतिपत्नींनीं आपापलीं कर्तव्यें यथायोग्य रीतीनें बजावणें म्हणजे समाजासंबंधी कर्तव्यें बजावणेंच आहे. अर्थात् या कर्तव्यक्षेत्राची व्याप्ति जितकी वाढेल तितकी समाजसेवा उच्चदर्जाची ठरेल. गृहिणीपेक्षां ( म्हणजे गृहव्यवस्था ठेवते ती गृहिणी अशा अर्थानें. ) शिक्षक स्त्री श्रेष्ठ ठरेल पण ती जेव्हां पगार घेणार नाहीं तेव्हां. असो. मला तुला येवढेंच सांगायचें आहे कीं, समाजसेवा करायची तर लग्नच करतां कामा नये, अशी वृत्ति उपयोगाची नाहीं. मादाम क्यूरी विवाहित आहे तशीच सरोजिनी नायडूही विवाहित आहे आणि रमा-बाई रानडेही विवाहितच होत्या. मात्र विवाहाचा प्रत्येकीवर जुलूम आहे असे नाहीं. श्रेष्ठ समाजसेवा करावयाची म्हणून अविवाहित रहाणें हें स्तुत्यच आहे पण अविवाहित राहून आपण जें चुकीचें शिक्षण घेतलें तेंच पुढील पिढीस शिकवायचें हें मात्र अजब आहे.

कांहीं बायका लग्न करणें म्हणजे गुलामगिरी पतकरणें असें समजून अवि-वाहित राहतात. किती बरं ही चुकीची समजूत ! आम्ही पैसे मिळवून दे

पोषण करतों आणि तुम्ही बायका कुटुंबव्यवस्था चालवून आणि मुलांची शारीरिक व मानसिक जोपासना करून आपलें कर्तव्य बजावतां. दोघांचींही कर्तव्यें आपापल्या परीनें श्रेष्ठ आहेत. परंतु लौकिकदृष्ट्या पैशाला महत्त्व असल्यामुळें आमच्या कर्तव्याला अधिक मान मिळतो. हा खरोखरी विपरीत प्रकार आहे पण तो आहे खरा. आणि त्याचें निराकरण होणें अत्यावश्यक आहे. त्याला उपाय म्हणजे स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य मिळालें पाहिजे. मुलांच्या बरोबरीनें मुलींनाही पित्याच्या संपत्तीचा वाटा मिळाला पाहिजे. तें आर्थिक स्वातंत्र्य नोकरी करून मिळविण्याच्या भानगडींत स्त्रियांनीं पडूं नये. नाहींतर कुटुंबसंस्थेची हानी झाल्यावांचून राहाणार नाहीं.

तुम्हांला योग्य तें आर्थिक स्वातंत्र्य मिळालें म्हणजे तुम्हांला अधिक मान मिळेल यांत शंका नाहीं. स्त्रियांना कनिष्ठ लेखिल्यानें कुटुंबसंस्था उत्तम रहाणें अशक्य आहे. पतिपत्नींना कुटुंबांत जर समान दर्जा असेल तरच तें आदर्श कुटुंब होईल. दोन अर्धवर्तुलाकृति नीट जुळवून ठेवल्या तरच निर्दोष वर्तुलाकृति बनेल, त्यांतील एका अर्धातील कांहीं भाग काढून टाकला तर पुरें वर्तुळ जमणार नाहीं. किंवा दोन अर्धवर्तुलाकृति विरुद्ध दिशेनें जुळवून ठेवल्या अथवा एकीवर एक ठेवल्या तरी वर्तुळ जमणार नाहीं. तसेंच स्त्रीपुरुषांचेंही आहे. आपापल्या कर्तव्यांत निपुण अशा पतिपत्नींनीं एकमेकांची योग्यता जाणून, प्रेमग्रंथींनीं निकट येऊन, एकमेकांच्या कार्यक्षेत्रांत विनाकारण ढवळाढवळ न करतां किंवा आपल्या कर्तव्याऐवजीं दुसऱ्याचें कर्तव्य करायला न जातां गोडीगुलाबीनें संसार केला तर तो आदर्श झाल्यावांचून राहील काय ?

आतां स्त्रीपुरुषांचीं कर्तव्यक्षेत्रें जर भिन्न आहेत तर त्यांना शिक्षणही भिन्न तऱ्हेनें मिळणें अत्यावश्यक ठरतें. उत्तम गृहिणी आणि उत्तम माता बनविणारें शिक्षणच तुम्हाला हवें. शरीर आणि मन यांनीं सुदृढ, आणि सुशिक्षित अशी जर माता असेल तर तिची प्रजाही तशीच निपजेल. संततीच्या श्रेष्ठपणावरच मातेचें श्रेष्ठत्व अवलंबून असतें. चित्रावरून चित्रकाराची योग्यता तशीच ही

स्थिती असते. रसिक चित्राकडे पहातात आणि त्याची वाखाणणी करतात. चित्रकार मात्र चित्रापुढें दुय्यम दर्जा पावतो. चित्रामुळेंच केवळ चित्रकाराला स्तुतिलाभ होतो. त्यानें चित्र निर्माण केलें नसतें तर त्याच्या कलेची कोणीही वाखाणणी केली नसती. पण चित्रकाराला त्याबद्दल वाईट वाटतें का? मुळींच नाहीं. कारण चित्राच्या ठिकाणीं त्याची तन्मयता झालेली असते. मातेची तरी तशीच स्थिति असते पण तिला त्यांत दिव्य आनंदाची प्राप्ति होत असते.

परंतु पुरुषी शिक्षणानें तुमच्या स्वाभाविक गुणांचा लोप होतो. गृहिणीपद आणि मातृपद तुम्हाला नकोसें होतें. तुमचें मन या पदांवर आरूढ होण्यासाठीं तळमळतें. पण नैसर्गिक गुणांचा विसर पडल्यामुळें तुम्ही आपली कष्टकर कर्तव्यें टाळूं लागतां. आपली लिली—पण जाऊं दे तें.

लिलीचें नांव काढतांच माझ्या डोळ्यांत पाणी आलें. एक सुस्कारा माझ्या तोंडून बाहेर पडला. अग्निमित्राचाही गळा क्षणभर दाटून आला होता पण लगेच मग आवरून ते म्हणाले, “ अं हं. अशी निराश होऊं नको. तूं समंजस आहेस. भलताच दुराग्रह धरून माझें शिकणेंच उत्तम असें तूं म्हणणारी नाहींस. तुला त्या शिक्षणानें चांगलीच अद्दल घडवून दिली आहे. पण त्या तुझ्या कडू अनुभवाचा फायदा तूं तुझ्या भगिनींना करून दे. त्यांनींही पुढील पिढीला हेंच पुरुषीशिक्षण देण्याचा अट्टाहास धरून राष्ट्राची हानी करूं नये यासाठीं तूं आपले अनुभव लिहून काढ आणि विचार करून एकादी शिक्षणाची दिशा ठरवून तूं योजना तयार कर. त्यामुळें थोडी जरी विचारांना चालना मिळाली तरी मी त्याला उत्तम समाजसेवा हेंच नांव देईन. ”

मी पुष्कळ विचार केला. माझे शाळा कॉलेजांतील आठवले ते अनुभव मी लिहून काढले आणि त्यांच्या अनुरोधानें खालील योजना तयार केली.

*           *           *

## माझी स्त्रीशिक्षणविषयक योजना.

शाळेची सध्यांची वेळ बदलावी असें बरेच म्हणूं लागले आहेत. पण आहे ती वेळ बदलणें सोईचें होणार नाहीं असें मला वाटतें.

सध्यां शाळा अकरा ते साडेचार किंवा साडेअकरा ते पांच या वेळांत भरतात. दहा वाजतां घाईनें जेवण उरकून विद्यार्थ्यांना शाळेंत जाणें भाग पडतें. ही एक मोठीच आरोग्यविघातक गोष्ट आहे यांत शंका नाहीं.

परंतु आहे या वेळेंत फरक तरी कसा करणार ? सकाळीं आठ ते अकरा व पुन्हां दुपारीं दोन ते पांच अशी शाळा करावी तर दोन वेळां शाळेंत जावें लागेल. शिवाय अकराला आणि दोनाला अशा दोन भर उन्हाच्या खेपा होतील तें वेगळेंच. कांहीं मुलें लांबून शाळेंत येतात त्यांना एकदां येणेंच त्रासदायक असतें मग दोनदां जाणे येणें तर किती त्रासाचें होईल ?

लहान मुलांना वेळच्या वेळीं जेवायला घालून, इकडे तिकडे पडलेले कपडे व पुस्तकें वगैरे शोधून तयारी करून त्यांना एकदां पाठवायचें तर आईची कोण त्रेधा उडते. दोन वेळां पाठवायचें म्हणजे दुप्पट त्रास !

मोठ्या विद्यार्थ्यांना दोन वेळां शाळेंत जाणें येणें कठिण नाहीं पण मग त्यांनी घरी अभ्यास केव्हां करायचा ? सकाळचा वेळ शाळेंत जाणार, पुढें जेवण करून जरा विश्रांति हवीच. संध्याकाळीं तर हिंडण्याफिरण्याची वेळ असते. मग येऊन जाऊन अभ्यासाला वेळ काय तो रात्रीच्या जेवणानंतर राह्यला. आणि दिवसभर दमल्यावर रात्रीं अभ्यास नीट रीतीनें होईल कीं नाहीं ही शंकाच वाटते.

बरं आठ ते एक किंवा नऊ ते दोन अशी शाळा केली तर जेवणाचे हाल होतील. आपण कांहीं उठल्याबरोबर न्याहारी करीत नाहीं. आणि समजा केली तरी बाराएकपर्यंत भूक लागणार नाहीं असे पदार्थ आपल्या खाण्यांत येत नाहींत. भाकरी पोळी फार खाऊन पचत नाहीं आणि थोडी खाल्ली तर भूक लवकर लागते. एकंदरींत आपल्या जेवणाच्या वेळा आणि पदार्थ लक्षांत घेतां सध्यांची वेळच त्यांतल्यात्यांत सोयीची वाटते. असो.

मराठी चार इयत्तांपर्यंत सध्यां आहे तें शिक्षण ठीक आहे. शिवण मुळींच गाळून टाकून अलीकडे शाळांत शिकवतात तसलीं बारीकसारीक

हस्तकौशल्याचीं कामें सुरू करावींत. शिक्षकिणी मायाळू अशा पाहून नेमाव्या. मुलींच्या शाळेंत सर्व स्त्रीशिक्षक नेमाव्या.

यानंतर पांच इयत्तांपर्यंत आहेत ते विषय योग्य आहेत. इंग्रजींतून मात्र कोणतेही विषय शिकवूं नयेत. इंग्रजीशिवाय सर्व शिक्षण मातृभाषेंतच मिळालें पाहिजे. मातृभाषा म्हणजे प्रत्येक जातीच्या विद्यार्थिनीची भाषा नव्हे तर प्रांतभेदाप्रमाणें ठरणारी मातृभाषा. महाराष्ट्रांत शिक्षण मराठींतूनच पाहिजे.

संस्कृत तिसरीपासूनच शिकवण्यास सुरवात करावी. संस्कृत शिकून काय करायचें असें हल्लीं कांहीं म्हणूं लागले आहेत. पण संस्कृत वाङ्मय इतकें सुंदर आहे कीं तें सुशिक्षित मनुष्यानें थोडें तरी वाचलें असणें अगदीं अत्यावश्यक आहे. संस्कृत शिकल्यानेंच मराठी भाषा चांगली लिहितां येते. माझें तर म्हणणें असें आहे कीं हिंदु मुलीनें संस्कृत अवश्य शिकलें पाहिजे. शाळेंत त्याची हेळसांड होतां उपयोगी नाहीं. वाचनांत जरूर तेवढेंच व्याकरण असावें. उगीच किचकट व्याकरणांत शिरू नये.

गणित विषय शिकवावयाचा त्यांत, त्रैराशिकें तशींच पंचराशिकें, लेखी तशींच तोंडींही आलीं पाहिजेत. हिशेबाच्या, घरांत उपयोगी पडणाऱ्या रीति नित्य ताज्या असल्या पाहिजेत. मराठी चार इयत्तांतच हिशेबांची हद्द ठरवूं नये. इंग्रजी चवथी व पांचवींत भूमिति आणि बीजगणितही असावें.

मराठी आणि इंग्रजी यासाठीं पुस्तकें लावावयाचीं तीं कंटाळवाणीं नसावीं. सर्वच पुस्तक निबंधवजा असलें तर अभ्यास नकोसा वाटतो. उपदेशपर गोष्टी आणि सुंदर निबंध असे सारख्या प्रमाणांत असावे. मराठी कविता कांहीं पूर्वींच्या कवींच्या आणि कांहीं अर्वाचीन कवींच्या असाव्या. पुस्तकांतील मजकूर शिष्टसंमत होईल असाच असावा.

हिंदुस्थानचा ढोबळ पूर्वेतिहास, (म्हणजे रजपूत राज्यें, विजयनगरचें साम्राज्य वगैरेंचा काल); मोगलाई, शिवाजीचा काल, पेशवाई आणि हिंदुस्थानचा संबंध आल्यापासूनचा इंग्लंडचा इतिहास व हिंदुस्थानांतील

इंग्रजशाहीचा इतिहास हे सर्व नीट तयार करावे. एकाद्याच कालाला विशेष महत्त्व देण्याचें कारण नाहीं.

भूगोलासाठीं समग्र हिंदुस्थान असावें. बाकींच्या देशांची व्यवहारोपयोगी माहिती असली म्हणजे बस्स. इंग्लंडच्या अमुक गांवांत अमुक फळ उत्तम होतें किंवा ऑस्ट्रेलियांत अमुक स्थळ हवापाण्यासाठीं प्रसिद्ध आहे ही माहिती काय करायची ? इतर खंडांतील ढोबळ देशविभाग, त्यांतील मुख्य जाती व भाषा, पर्वत, नद्या, पशुपक्षी, आणि मुख्य व्यापारधंदे, तशीच स्थूल राज्य-व्यवस्था व चारपांच मुख्य गांवें अशी माहिती पुरे.

सायन्स ठीक आहे.

हल्लीं बाग म्हणजे चार पांच वाफे करून त्यांत एकजात कसलीं तरी फुलझाडें लावायचीं, वर्षभर आळीपाळीनें त्यांना पाणी घालीत रहायचें आणि बागेचा तास असेल तेव्हां गप्पा मारीत वाफ्यांतलें गवत उपटायचें, असें असतें. यापेक्षां एकाद्या बागेंत नेऊन, बागेची रचना, तऱ्हेतऱ्हेचीं झाडें, फळें, भाज्या व तेथें नवीन करीत असलेलीं कलमें वगैरेंची माहिती दिली तर किती चांगलें होईल ! दुसऱ्या बगीच्यांत जाणें जमलें नाहीं तरी शाळेंत थोडीबहुत बाग असते तेथल्याच झाडांची माहिती द्यावी. झाडें लावण्याची माहिती व्हावी म्हणून पाहिजे तर थोडीं रोपें लावावीं. पण वर्षभर झाडें लावून झाल्यावर सर्व तास पाणी घालीत गवत उपटण्यांत घालवायचे यांत काय अर्थ आहे ! शाळेंत हा विषय शिकवण्यासाठीं तज्ज्ञच नेमावी.

नीतिशिक्षणाकडे योग्य तें लक्ष घालावें. गुणवान् पुरुषांचीं चरित्रें तशींच निरनिराळ्या मुख्य धर्मांची तुलनात्मक माहिती द्यावी. व्याख्यानरूपानें बोध करण्यापेक्षां कीर्तनरूपानें केलेला बोध मनावर अधिक ठसतो आणि शिवाय मौज वाटते. सर्व शाळेसाठीं पाहिजे तर एक स्वतंत्र कीर्तन करणारी विद्वान् स्त्री नेमावी.

पहिलीपासून पांचवीपर्यंत पांच वर्षांत, चोळी बेतणें व शिवणें, पोलका बेतणें व शिवणें, रुमाल विणणें किंवा लोंकरीचें काम किंवा भरतकाम शिकवावें.

पुरुषी ड्रीलचें शिक्षण देण्यापेक्षां सोपे व सभ्य नृत्यप्रकार शिकवावे. शिवाय प्रतिदिवशीं नियमित व्यायामाची सोय ठेवली पाहिजे. या विषयाची हेळसांड होतां कामा नये.

गायन, वादन आणि चित्रकला काळजीपूर्वक शिकवावी.

याप्रमाणें विषय तयार करण्याकडे लक्ष ठेवावें. या इयत्तांच्या परीक्षा घेतल्या तरी हरकत नाहीं. पण आठवड्याच्या परीक्षा जरूर ठेवाव्या. वार्षिक परीक्षेंत मुलगी एकाद्या विषयांत थोड्या मार्कांनीं नापास झाली आणि आठवडयाच्या परीक्षांत या विषयांत तिला चांगलें मार्क असले तर तिला वरील वर्गांत घालावी.

अगदीं प्रथम वर्गाला बालवर्ग, शिशुवर्ग, बिगर इयत्ता अशीं तऱ्हेतऱ्हेचीं नांवें देण्यापेक्षां त्या इयत्तेलाच पहिलीचा वर्ग म्हणावें. पुढें मराठी चार इयत्तांनंतर इंग्रजी पहिली, इंग्रजी दुसरी, तिसरी असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे तो काढून इंग्रजी पहिलीला सहावी इयत्ता, इंग्रजी दुसरीला सातवी, इंग्रजी तिसरीला आठवी, इंग्रजी चवथीला नववी, आणि इंग्रजी पांचवीला दहावी इयत्ता म्हणावें.

या सर्व इयत्ता होईपर्यंत मुलीचें वय— ती सर्व इयत्ता योग्य वेळीं पास झाली असल्यास— पंधरासोळा वर्षांचें होतें. म्हणजे या वेळीं ती वयांत आलेली असते. यानंतर शिक्षणाची दिशा बदलून स्त्रीला उचित असें गृहशिक्षण देण्याला सुरवात करावी.

यानंतर दीड वर्ष क्लबस् करून पंचवीस मुली एका क्लबांत याप्रमाणें राहून मुलींनीं गृहशिक्षण घ्यावें. ही योजना शाळेनेंच करावी.

या काळांत झाडलोट करणें, निरनिराळ्या धातूंचीं भांडीं घासणें, निरनिराळ्या जातींचे कपडे धुणें, निरनिराळ्या धान्यांची पारख करणें आणि सांठवणें व त्यांची निगा राखणें, निरनिराळीं पक्वानें, लोणचीं, पापड, मुरंबे व इतर स्वैपाकाचे पदार्थ बनवणें, दूधदुभत्याची व्यवस्था ठेवणें, पाटपाणी

रांगोळ्या करून वाढणें आणि जमाखर्च ठेवणें वगैरे संसारोपयोगी गोष्टींची मुलींना माहिती देऊन त्या त्यांच्याकडून प्रत्यक्ष करून घ्याव्या.

धान्य, भाजीपाला, फळफळावळ यांचें शास्त्रदृष्ट्या गुणधर्मविवेचन करावें.

प्रत्येक गोष्ट, थोडा वेळ व थोडा पैसा खर्चून, आरोग्यवर्धक रीतीनें, नीटनेटकेपणा आणि स्वच्छता राखून कशी करावी हें मुलींना समजलें पाहिजे.

या शिवाय शाळेंत होणाऱ्या संमेलनांचीही व्यवस्था याच मुलींच्याकडून शिक्षकांनीं करून घ्यावी.

धर्मविधींकडेहि अवश्य लक्ष द्यावें. हिंदूंचें संघटण होण्याला धार्मिक आचारविचार हे अत्यंत उपयोगी आहेत. याशिवाय रोजचा यांत्रिक दिनक्रम बदलून सणावारीं करावयाच्या आचारांत मन रमून जातें हाही एक फायदा आहे. पण हल्लींच्या रूढ विधींना विचारपूर्वक वेगळें वळण देणें आवश्यक आहे. हरितालिकेची पूजा चांगला नवरा मिळावयाच्या लोभानें करावयाची नसून गौरीनें इच्छित वरप्राप्तीसाठीं जें धाडस केलें व चिकाटी दाखवली त्याबद्दल तिच्या स्मरणार्थ व आदरप्रदर्शनार्थ करावयाची असें त्याला स्वरूप आलें पाहिजे. तसेंच त्या दिवशीं उपास करावयाचा तोही देहमनशुद्ध्यर्थ. डाळिंब खाल्लें तर माकडाचा जन्म येईल या भीतीनें नव्हे.

जमल्यास एकादें देवालय किंवा देवघर करावें, व सबंध शाळेसाठीं नेमलेल्या कीर्तनकार स्त्रीकडे याची पूजाअर्चा सोपवावी. मुलींनीं सकाळसंध्याकाळ येथें जमून चारपांच प्रार्थनेचे श्लोक म्हणावे किंवा आरती करावी. देवालय बांधण्याचा वेगळा खर्च करण्यापेक्षां शाळेच्या सभागृहांतच मूर्तीची स्थापना करावी.

शाळेंतील प्रत्येक मुलीला हिंदुधर्माचें शुद्ध स्वरूप समजून तिला हिंदुत्वाविषयीं अभिमान वाटावा यासाठीं जरूर प्रयत्न झाले पाहिजेत.

दीड वर्षानंतर सहा महिने मुलींना जरूरीपुरते, रोग्याची निगा, गरोदरपण व बाळंतपण तसेंच बालसंगोपन हे विषय समजावून द्यावे.

या दोन वर्षांत, विद्यार्थिनींनीं आवडीप्रमाणें कलाशिक्षण व वाचन चालू ठेवावें.

शिक्षकिणीनें, या दोन वर्षांत विद्यार्थिनीनें दाखविलेली कुशलता पाहून सर्टिफिकेट द्यावें. परीक्षा ठेवण्याची जरूरी नाहीं. पाहिजे तर एकादा विषय शिकवल्यावर तेवढ्याच विषयाची तात्पुरती परीक्षा घ्यावी.

या वेळीं विद्यार्थिनीचें वय सतरा किंवा अठरा वर्षांचें झालेलें असतें.

आतां मुलींचें गृहशिक्षण पुरें झालें असें म्हणावयास हरकत नाहीं. एकादीला जर एकाद्या विषयाचें अधिक शिक्षण पाहिजे असेल तर तिनें आणखी दोन किंवा तीन वर्षे शिकावें. बी. ए. नंतर एम्. ए. व्हावयाचें तसेंच हें. यासाठीं एक कॉलेज असावें. त्यांत गणित, इतिहास व राज्यव्यवस्था, फिजिक्स, निरनिराळ्या भाषा, स्त्रियांना करण्याजोगे धंदे–म्हणजे, वैद्यविद्या, धोबीपणा, गवळीपणा वगैरे आणि कला म्हणजे शिवण, गायन, वादन, नृत्य आणि चित्रकला, सूपशास्त्र–असें शिकवावें.

या कॉलेजांत प्रत्येक विद्यार्थिनीनें आपल्या आवडीप्रमाणें व सवडीप्रमाणें एक किंवा अनेक विषयांचे अध्ययन करावें.

ज्या विषयांत विद्यार्थिनी निपुणता संपादन करील त्या विषयांचें तिला प्रशंसापत्र मिळावें.

या विषयांच्या परीक्षा ठेवण्यासही हरकत नाहीं. कारण हौसेच्या विषयाच्या परीक्षेचा मोठासा त्रास किंवा कंटाळा वाटत नाहीं.

याप्रमाणें अभ्यासक्रम ठेवल्यास तो वीस वर्षांपर्यंत संपून मुलीचें वय विवाहानुकूल असेंच राहील.

या शिक्षणाच्या अध्ययनानें मुलगी गृहिणीपद व मातृपद योग्य रीतीनें संभाळण्यास तयार होईल.

वरं तशीच जरूर पडली तर तिला मुलींच्या शाळेंत शिक्षक होतां येईल किंवा शिकलेल्या एकाद्या धंद्यावर किंवा कलेवरही तिला उदरनिर्वाह करतां येईल.

---

( माझी प्रिय मैत्रिण नलिनी हिचीं या विषयावरील विचारांचीं पत्रें शालिनीनें मला दाखविलीं. लोकांच्या नजरेसमोर येण्याजोगीं वाटल्यावरून मी तीं पत्रें नलिनीच्या परवानगीनें छापीत आहें. पत्रांतील अगदीं खाजगी भाग काढून टाकला आहे. )

प्रिय शालिनीस सप्रेम नमस्कार. वि. वि.

या सबंध महिन्यांत मी तुला पत्र पाठवलें नाहीं म्हणून तूं रागावली असशील नाही ? पण काय करूं ग, मला अगदीं कशी ती फुरसत झाली नाहीं. अभ्यासामुळें नव्हे हो. नाही तर लगेच मला विचारशील कीं, प्रिव्हिअसची कॉलेजची तर परीक्षा आणि दिवाळी झाली नाहीं तों अभ्यासाला लागलीस कां काय म्हणून. नाहीं शालिनी, त्याचें कारण वेगळेंच आहे. तें कारण म्हणजे सध्यां आमच्या घरीं पाहुण्यांची गर्दी उडाली आहे. आधींच दिवाळी आणि त्यांत पाहुणे म्हणजे बायकांच्या जिवाची कशी धांदल होते तें कांहीं तुला सांगायला नको. हें एवढें सबळ कारण तुझा राग जायला पुरेसें होईल ना ?

आतां मार्गशीर्ष महिना जवळ आल्यामुळें पुण्यांत लग्नाचे मुलगे आणि मुली भराभर जमूं लागल्या आहेत. आमच्या घरीं दोन लग्नच्या मुली आल्या आहेत. त्या दोघींचेही वडील आमच्या बाबांचे मित्र आहेत, त्यामुळें ते आमच्याच येथें मुलींना घेऊन स्थळें पहाण्यासाठीं आले आहेत. त्या मुलींना कितीतरी ठिकाणचे लोक पहायला येतात.

शालिनी, मी आमच्या पाहुण्यांचीं येवढीं वर्णनें देत आहें आणि रोज हकिकती घडतात त्याच तुला कळवीत आहें म्हणून आश्चर्य वाटत असेल नाहीं ? पण शालिनी, त्या मुलीसाठीं स्थळें पहाण्याचा व मुलींना दाखवण्याचा धुमाकूळ पाहून माझ्या मनांत आपल्या विवाहसंस्थेविषयीं फारच विचार

येऊं लागले आहेत. शालिनी, तूं इथं असतीस तर आपण विचारविनिमय केला असता. आपण शाळेंत असतांना किती विषयांवर वादविवाद करीत असूं नाहीं ग ? पण तूं विल्सन कॉलेजांत गेल्यामुळें आपली ताटातूट झाली. बरं. आतां बोलायला सांपडत नाहीं तर लिहूनच मी आपली इच्छा तृप्त करतें. हो दूध नाहीं मिळालें तर ताक आहेच. पण शालिनी, हें आतां पुरे. मी आतां एकदम माझे विचार तुला सांगतें. नाहीं तर पत्र अवाच्या सवाच लांबेल आणि तुला ते वाचायचासुद्धां कंटाळा येईल.

आमच्या घरीं आलेल्या मुलींना पहाण्यासाटीं रोज कितीक ठिकाणचे लोक येतात आणि त्या मुलींनासुद्धां कितीतरी ठिकाणीं त्यांचे वडील दाखवायला घेऊन जातात. या महिन्यांतच प्रत्येकीला निदान शंभर शंभर ठिकाणीं तरी दाखविली असेल.

मुलाच्या मंडळींचा काय मान विचारतां ! आधीं दोन तीन बोलावणीं पाठवावीं तेव्हां कुठें मंडळीं मुलगी पहायला यायचें कबूल करतात. मग येणारीं माणसें सुधारक कुधारक पाहून मुलीचा थाट करावा लागतो. एकादे वेळीं मुलाची मंडळी न आल्यामुळें हा शृंगार फुकट जातो ती गोष्ट निराळीच.

मंडळी आली म्हणजे मुलीची हवी तशी परीक्षा करण्यांत येते. त्यांत किती आचरट प्रश्न विचारतात आणि मुलीच्या मनोभावनांकडे कसें दुर्लक्ष करण्यांत येतें हें कांहीं नव्यानें तुला सांगायला नको. शालिनी, गुरांच्या बाजारांत तूं कधीं गेली आहेस कां ? म्हैस विकण्यायोग्य धष्टपुष्ट झाली म्हणजे तिला विक्रीसाटीं बाजारांत आणतात. तिला हवे तेवढे लोक येऊन पाहून जातात. एकाद्या गिऱ्हाइकाला ती पसंत पडली म्हणजे सौदा टरवण्यांत येतो. याच तऱ्हेनें पांच मिनिटें मुलगी पाहून मुलीच्या देण्याघेण्याचा सौदा ठरतो. आणि म्हशीला निदान एकाच ठिकाणीं तरी नेऊन उभी करतात; पण आमच्या मुलींना तर भाजीवाली जशी भाजी घेऊन दारोदार हिंडते तसें दाखविण्यासाटीं दारोदार हिंडवण्यांत येतें. शालिनी, आपल्या पूर्वीच्या लोकांची

परक्या घरीं मुलीला कध्धीं दाखवायला न्यायची नाहीं अशी चाल होती ती तुला माहित आहे ना ? पण अलीकडच्या सुधारलेल्या लोकांनीं ती पार झुगारून दिली आहे. आणि आतांच्या मुली तर चांगल्या जाणत्या झालेल्या असतात. त्याच्या मनोभावनांची नको कां ग जरा तरी काळजी करायला ?

पण शालिनी, मला हें पत्र येथेंच पुरें केलें पाहिजे, कारण वेणूला आतां कोणी मंडळी पहायला येणार आहेत. त्यांच्या चहाबिहाची तयारी केली पाहिजे. पाहायला येऊं म्हणून त्यांच्याकडून निरोप आलेला आहे. नेमकी चारालाच मंडळी येतील असें कांहीं नाहीं, पण आपल्याकडून तयारी असलेली बरी. खरंच शालिनी, चहा करतां करतां माझा कितीतरी वेळ फुकट जातो. पण चहा दिला नाहीं तर उगीच माणसांचें आदरातिथ्य करावयाचेंसुद्धां कळत नाहीं म्हणून लग्न जमत असलेलें मोडायचें! मी कशाला तें अपयश पदरीं घेऊं ?

शालिनी, तूं म्हणशील कीं, मुलीला खाऊचा पुडा मिळेल त्यांतून तुला थोडी बक्षिसी मिळून चहा केल्याच्या श्रमांचें हरण होईल म्हणून. पण त्याची यत्किंचितसुद्धां आशा नाहीं बरं. मुलाकडील माणसें आतां चहा हक्कानें घेतात, पण येवढ्या मोठाल्या मुली, त्यांना कसला खाऊ, म्हणून पेढ्याचे किंवा बत्ताशांचे पुडे देण्याची चाल मात्र या मंडळींनीं अजिबात काढून टाकली आहे. यांना असें समजत नाहीं कीं, मुली मोठाल्या झाल्या म्हणजे त्यांना पेढे खातां येत नाहींत कां काय ? आणि मुलाला चहा देऊन वर पेढ्यांचा पुडा दिला तर तो नको म्हणेल ? येवढेंच कशाला ? त्याला थोडें पेपरमिंट किंवा एखादें चॉकोलेटचें पॅकेट दिलें तर तें तो खाणार नाहीं कां ग ?

बरं, मुलाचीं माणसें म्हणतील कीं पांच पांनशें मुली पहायच्या त्यांना खाऊचे पुडे कुठवर द्यायचे ? तर मग मुलीच्या माणसांनीं तरी पांचपांचशें घरच्या माणसांना चहा कुठवर पुरवायचा ?

बरं जाऊं दे. आणखी एक पानभर जरी रागारागांत तुला लिहिलें तरी

माझ्या मागचें चहा करायचें कांहीं सुटत नाहीं आणि खाऊही मिळावयाचा नाहीं. मनांत विचार पुष्कळ आहेत पण ते आतां पुढील पत्रांत लिहीन. शालिनी, तूंही वेळोवेळीं आपलीं मतें मला कळवशील ना ?

तुझीच

**नलिनी**

---

## २

शालिनीस सप्रेम नमस्कार वि. वि.

तुझें पत्र पोंचलें. आपल्या विवाहसंस्थेविषयीं मी लिहिलेलें तुला पसंत पडलें आणि माझे आणखीही विचार तुला कळून घ्यावयाचे आहेत हें ऐकून फार आनंद झाला. मला तरी माझे विचार तुला कळवावयाचेच आहेत. तेव्हां सवडीनुसार अशींच पत्रें लिहून माझे विचार मी तुला कळवीन.

शालिनी, आपण एके ठिकाणीं असतों तर एकाद्या तासांत शंभर मुद्द्यांना हात घालून साऱ्या विषयांचा गोंधळ केला असता आणि आपला सगळा वादविवाद वाऱ्याबरोबरच विलयाला गेला असता असें जें तूं लिहिलें आहेस तें मला अगदीं पूर्णपणें पटलें. तूं एथें नाहींस हें एका अर्थीं मला बरेंच वाटतें. पत्रांत विचार ग्रथित केल्यानें माझ्या विचारांना मूर्त स्वरूप प्राप्त होईल. असो.

आतां आमच्या घरीं ज्या पाहुण्या मुली आहेत त्यांची मी तुला थोडीशी हकिगत सांगतें. त्यांची हकिगत म्हणजे सुद्धां हल्लींच्या काळीं प्रमुखत्वानें दिसून येणाऱ्या नमुन्याचीच आहे. एका मुलीचें नांव वेणू आणि दुसरीचें विमला आहे. वेणूचें वय वीस वर्षांचें असून, तिला आज आठ वर्षें स्थळें पहात आहेत. स्थळें बघून बघून तिचे वडील अगदीं कंटाळले आहेत. हजारभर रुपये हुंडाही द्यायला तयार आहेत. पण हुंड्यापर्यंत बोलणेंच येत नाहीं. मुळीं मुलगी दाखवायला न्यावी तेथें मुलगी दिसायला चांगली नाहीं म्हणून नाकारतात.

शालिनी, आपला एकादा लेख कुणी नाकारला तर आपल्याला वाईट वाटतें ना ग ? आणि प्रत्यक्ष आपल्यालाच नाकारल्यावर या मुलींच्या मनाला केवढा बरें धक्का बसत असेल ? एकेका धक्क्याबरोबर यांचा स्वाभिमानही डळमळीत झाल्याशिवाय रहात असेल कां ? असेल कां कशाला ? होतोच. वेणूला असे धक्के दोन हजार वेळां तरी बसलेले आहेत. वेणू ही लहानपणीं चांगली पाणीदार मुलगी होती हें मला माहीत आहे, पण हल्लीं ती गरीब गाईसारखी झाली आहे. तिचें कोणाच्या भाषणाकडे लक्ष नसतें, ती फारशी कोणाशीं बोलत नाहीं, सारखी मनांतल्या मनांत कुढत असते. हंसण्याची कलाच जणूं ती विसरून गेली आहे. खरोखर वेणूचा स्वभाव किती सालस आणि प्रेमळ आहे म्हणून सांगूं, फारच सुशील मुलगी आहे ती. पण तिकडे लक्ष कोण देतो ?

वेणूनें हल्लीं बाहेर जाण्याचें अगदीं सोडून दिलें आहे; कारण ती कुठें बाहेर गेली कीं, बायका लगेच नाक मुरडून विचारतात, " इश्श, अजून नाहीं कां हिचं जमत ? काय बाई नशीब तरी ! " हीं तिरस्काराचीं बोलणीं न् चेष्टेचीं हंसणीं ऐकायला नकोत म्हणून ती आपली कुठें जातच नाहीं.

शालिनी, एकंदर जगाविषयीं तिचें मत काय बरं झालं असेल ? तिला जर लोकांविषयीं तिरस्कार वाटला तर त्यांत कांहीं नवल कां आहे ?

" मी जर चांगली आहें तर लोकांशीं मला काय करायचें आहे ? " असें म्हणून आनंदांत रहाणें हें मला वाटतें अति उच्च दर्जाच्या एकाद्या मुलीला किंवा जिच्या भावना अगदीं बोथट आहेत अशा मुलीलाच साधेल. सामान्य मुलींना तें कांहीं साधणार नाहीं. आतां दुसरें एकादें ध्येय जर डोळ्यासमोर असेल तर हें अंशतः विसरतां येईल. पण वेणूसारखीला तें कसें व्हावें ? वेणूला लहानपणापासून एकच ध्येय माहीत आहे. तिचें लक्ष बाराव्या वर्षापासून तिच्या आईबापांनीं एकाच गोष्टीवर खिळून ठेविलें आहे. तें म्हणजे लग्न. तेव्हांपासून माझें लग्न कधीं होईल म्हणून ती वाट पहाते आहे. लग्न व्हायचें म्हणून तिच्या वडिलांनीं तिच्या शिक्षणाकडे मुळीच लक्ष दिलें नाहीं

म्हटलें तरी चालेल आणि बारा वर्षांच्या मुलीला शिक्षणाचें महत्त्व कळून ती आपण होऊन तिकडे लक्ष लावील हें अशक्यच आहे.

तर आतां अशा मुलीच्या मनाची स्थिति किती निराशामय झाली असेल याची तुला सहज कल्पना करतां येईल. आणि अशा मनःस्थितींत त्या मुलीची प्रकृती बिघडली आणि तिला फिटस् येऊं लागल्या यांत तरी नवल काय ? फिटस्मुळें वेणूची शाळा अजिबात सुटली आहे. पुन्हां वर ह्या मुलीचे मनोविकारच तिच्या स्वाधीन नाहींत असें म्हणून लोक हंसायला तयार आहेतच.

आतां समज कीं या मुलीचें लग्न झालें तरी तिला जो जगाविषयीं तिरस्कार उत्पन्न झालेला आहे तो त्यामुळें कमी होईल कां ? तिला मग संसारांत सुख वाटणें शक्य नाहीं. तिचें निराशावादी बनलेलें मन निराशावादीच राहील. मग अशा आईचीं मुलें कितपत सुदृढ आणि समाजकार्यतत्पर निपजतील बरं ?

आणि वेणूची हकिगत म्हणजे कांहीं अगदीं अभूतपूर्व नाहीं. आपल्या समाजांत पुष्कळ मुलींची हीच हकिगत आहे. सुंदर मुलींची गोष्ट सोडून दिली तर हल्लीं प्रत्येक मुलीला कमींत कमी चार चार वर्षे लग्नासाठीं दाखवण्यांत कोणालाच कांहीं विशेष वाटेनासें झालें आहे. पूर्वी अमुक वयापर्यंत मुलींचें लग्न झालेंच पाहिजे अशी मर्यादा होती. ती निघाल्यामुळें आतां हा असा स्वतंत्र कारभार सुरू झाला आहे. म्हणजे पुन्हां ती मर्यादा लोकांनीं पाळावी असें नाहीं हो माझें म्हणणें. पण म्हणून सहा सहा आठ आठ वर्षे आपल्या मुलीला लग्नाच्या बाजारांत आणून उभी करायची आणि सदैव त्या मुलीच्या कानीं लग्न लग्न याशिवाय शब्दही पडूं द्यायचा नाहीं याविरुद्ध माझें बोलणें आहे.

मला वाटतें हें पत्र आतां पुरें करावें. हें पत्र वाचून पुष्कळ प्रश्न तुला विचारावेसे वाटतील हें मला माहीत आहे. मी हळू हळू तुझ्या शंकांचें निरसन करीनच. होतां होईल तों या विषयावर सर्वांगीण चर्चा मला करा-

यची आहे. पण ह्या विषयाचे मुद्दे असे बारीक बारीक आहेत कीं, कांहीं वेळेवर न आठवल्यामुळें ते राहूनच जातील कीं काय अशी मला भीति वाटते. म्हणून तूं आपल्या शंका मला वारंवार विचारीत जा, म्हणजे तो मुद्दा निसटायचा नाहीं आणि एकादा नवीनही मुद्दा मला कळेल. करशील ना हें येवढें ? क. लो. ही. वि.

तुझीच

**नलिनी.**

---

३

शालिनीस सप्रेम नमस्कार. वि. वि.

तुझ्या उत्तराची वाट न पहातांच हें पत्र मी लिहीत आहें; कारण आतांचे दोन तीन मुद्दे भराभर एकापुढें एक माझ्या मनांत आले आहेत. तुझें पत्र येईपर्यंत त्यावरील विचार तसेच मनांत घोळत ठेवले तर ते कदाचित् विस्कळित होऊन जातील. म्हणून मी लगेच सर्व कागदावर उतरीत आहें.

गेल्या पत्रांत वेणूची सविस्तर हकिगत मी तुला कळवली. आतां येथें असा प्रश्न येतो कीं, इतक्या लोकांनीं पाहून पाहून काय पाह्यलें ? वधूपरीक्षेंत कोणत्या बाबीकडे या लोकांनीं विशेष लक्ष पुरवलें ? कशांत गुण कमी पडल्यामुळें वेणूला नापास व्हावें लागलें ? तर सौंदर्य. या बाबींत उणेपणा असल्यामुळें वेणूला बहुतेकांनीं नापसंत केली.

किती ग ही खेदाची गोष्ट ! अंतरंगसौंदर्याकडे पार दुर्लक्ष करून निव्वळ बहिरंगसौंदर्य पहाणारे हे परीक्षक नव्हेत कां ? काय म्हणावं त्यांना सांग बरं. आपल्या जन्माची सहचारिणी निवडावयाची त्या बाबतींत अशी ढोबळ चूक करणाऱ्या वराला, वधूबरोबरच दुःखाचेंही पाणिग्रहण करण्याचा मान लाभला तर त्यांत आश्चर्य तें काय ? बहिरंगसौंदर्य हें किती दिवस टिकणारें आहे ? तें लवकर नाहींसें होणारच. आणि जरी कदाचित् तें मोठ्या वयापर्यंत टिकून राहिलें तरी पतीला पत्नीच्या सौंदर्याचें किती दिवस कौतुक वाटेल ?

फार तर एक वर्षभर. मग हळूं हळूं बाह्यसौंदर्याकडून मन मागें वळून त्याला अंतःसौंदर्याची जरूरी भासूं लागेल. वधूपरीक्षेच्या लॉटरींत त्याला अनुरूप पत्नी लाभली असली तर त्याचें सुदैव समजायचें. नाहीं तर "हिडिंबा पुरवली पण ही कैकेयी नको," असें त्याला वाटल्यावांचून राहील कां ?

वधूपरीक्षा म्हणजे लॉटरीच नाहीं तर काय ? पुष्कळ रंगांच्या कागदांत बांधलेल्या पुड्यांपैकीं सुंदर गुलाबी कागदांत बांधलेला पुडा उचलावा तशीच ही वधूची निवड म्हणायला हरकत नाहीं. मग त्या पुड्यांतून कदाचित् एखादी बहुमोल वस्तु निघेल किंवा एखादी गारगोटीही निघेल. तशीच एखादी मुलगी सद्गुणसंपन्न निघेल किंवा दुर्गणसंपन्न निघेल. मला वाटतें शंभरांतून एखाद्याला अनुरूप वधू मिळत असेल. आणि तीसुद्धां परीक्षण-चातुर्यामुळें नव्हे, तर निव्वळ दैवयोगानें. ही एक जोडी सुखी होईल पण बाकीच्या नव्याण्णव विजोड जोडप्यांचें काय ? "मग काय करायचें ? पदरीं पडलें न् पवित्र झालें," असें म्हणूनच ते आपला संसाराचा गाडा डोळ्यावर ढांपणें ओढून हांकीत रहाणार. त्याशिवाय त्यांना कांहीं गत्यंतरच नाहीं. शालिनी, आपल्याकडे घटस्फोटाची चाल नाहीं म्हणून वरून सारें स्थिरस्थावर दिसतें आहे. बाकी नीट पाहिलें तर सगळी घडी विस्कटलेली आहे असेंच आढळून आल्याखेरीज रहाणार नाहीं.

आतां मी वर जें लिहिलें आहे त्याचा अर्थ लोक बाह्यांगसौंदर्य पहातात म्हणजे लावण्यखनीखेरीज कुठलीच मुलगी पसंत होत नाहीं, असा नाहीं. सद्गुणसंपन्न मुलीखेरीज कोणतीच मुलगी पसंत करतां कामा नये असाही नाहीं किंवा प्रत्येकानें मुद्दाम कुरूप मुलगी करावी असाही नाहीं. बाह्यांगसौंदर्यापेक्षां अंतरंगसौंदर्याकडे अधिक लक्ष पुरवलें पाहिजे येवढेंच माझें म्हणणें आहे, कारण अंतरंगसौंदर्य हेंच खरें सुखाला साधनीभूत आहे. हें सगळ्यांना कळतें पण वळत नाहीं.

तर आतां वधूपरीक्षणांत बहिरंगसौंदर्याला दुय्यम स्थान द्यायचें येवढें ठरल्यावर अंतरंगसौंदर्याची मुलानें कशी परीक्षा करायची हा मुख्य प्रश्न येतो.

आपल्यायोग्य वधू निवडण्यासाठीं वरानें प्रथम आपल्या स्वभावाची ओळख करून घेतली पाहिजे. आणि मग आपल्याला पूर्णता प्राप्त होईल अशी अर्धांगी त्यानें निवडावी. त्यानें आपल्या आवडीनिवडीचाही विचार करणें जरूर आहे. स्वभाववैचित्र्याप्रमाणेंच मनुष्याचें रुचिवैचित्र्यही असतें. एकाद्याला सीता आवडेल, दुसऱ्याला द्रौपदी आवडेल, तर तिसऱ्याला सत्यभामा आवडेल.

शालिनी, अशा प्रकारें जर वधूवरांची निवड झाली तर हल्लींपेक्षां पुष्कळच सुखी कुटुंबें दृष्टीस पडूं लागतील असें तुला नाहीं कां वाटत ? खरी स्वभावाची पारख फारच थोड्यांना करतां येते, ही एक मोठीच अडचण आहे; पण अगदींच जें आंधळ्यासारखें वागायचें त्यापेक्षां डोळे उघडे ठेवल्यानें निवड अधिक चांगली होईल हें तर तुला कबूल आहे कीं नाहीं ?

शालिनी, मी आतांपर्यंत सारखी वरानें वधू कशी पसंत करावी हें सांगत आलें म्हणून जो वर आपल्याला पसंत करील त्याच्याशीं निमूटपणें लग्न करावें असें नाहीं हो मला म्हणायचें. वधूनेंही वराच्या स्वभावाची परीक्षा केलीच पाहिजे. पण अजून " सुंदर मुलाखेरीज मला मुळींच लग्न कर्तव्य नाहीं, " असें म्हणून कोणी मुलगी अडून बसल्याचें माझ्या ऐकण्यांत आलेलें नाहीं.

असो, जरी अर्धवटच मुद्दा राहिला आहे तरी पत्र येथेंच थांबवणें भाग आहे. फिरायला जायची माझी वेळ होऊन गेली आहे आणि लीला येऊन पांच मिनिटें चल चल करून मला छळीत आहे आणि कसला ग विषय घेतला आहेस म्हणून चिडवीत आहे. आलिया भोगासी असावें सादर, दुसरें काय ? आणखी पुढील पत्रांत लिहीन क. ही वि.

तुझीच
नलिनी.

---

# ४

शालिनीस सप्रेम नमस्कार. वि. वि.

तुझें पत्र पोंचलें. तूं विचारलेला प्रश्न मी आजच्या पत्रांत विचारास न घेतां पुढल्या पत्रांत घेणार आहें.

वधूपरीक्षेंत मुलीच्या स्वभावाकडे दुर्लक्ष करतात हें मी सांगितलेंच आहे सौंदर्याला अग्रस्थान मिळून स्वभावाला दुय्यम स्थान देण्यांत येतें. आतां मुलीच्या स्वरूपाची आणि स्वभावाची परीक्षा वरपक्षीय मंडळी कशी करतात हें आपण पाहूं.

अतिशय सुंदर मुलींची गोष्ट आपण सोडून देऊं. ज्या मुली दिसण्यांत साधारण असतात त्यांच्याविषयीं आपण विचार करूं. मुलीची परीक्षा पांच मिनिटांत व्हायची असते. खरोखर घड्याळ लावून पाह्यलें तर पांच मिनिटें सुद्धां भरणार नाहींत. मुली बहुधा पूर्वी कधीं पाहिलेल्या नाहींत अशा असतात. कोणी मुलीला पहायला आलें कीं मुलगी आधींच घाबरून गेलेली असते. हो, आतां मला वेणूची आठवण झाली. इतकीं वर्षें जरी तिला पहात आहेत तरी अजून कोणी पहायला आलें कीं ती अतिशय घाबरते, आणि त्यामुळें ओठ चावून इकडेतिकडे करण्याची संवय तिला लागली आहे. त्यामुळें मुलगी तोंडेंच वांकडी करते असें पहायला आलेली मंडळी म्हणतात. बाकी नेहमीं ती असें मुळींच करीत नाहीं. दुसऱ्याही एका मुलीची हकिगत मला माहीत आहे. घाबरल्यामुळें चालतांना त्या मुलीचे पाय वेडेवांकडे पडत त्यामुळें मुलगी पायानें अधू म्हणून तिच्यावर आक्षेप येई.

याच्या उलटही गोष्टी ऐकण्यांत येतात. एकाद्या मुलीचे थोडे केस पांढरे झाले तर कलप लावून तो दोष नाहींसा होतो. मुलगी थोडी नकटी असल्यास मोठ्याशा नथीनें तो दोष पुष्कळच कमी होतो. अशा बारीक सारीक चुका लग्न झाल्यावर पुष्कळ वेळां उघडकीस येतात.

आतां स्वभावपरीक्षेकडे पाहूं. मुलीला साधारणपणें चार पांच प्रश्न विचारण्यांत येतात. ते बहुधा ठराविकच असतात. त्या प्रश्नांच्या उत्तरावरून

आणि थोडेंसें वाचण्यावरून मुलीच्या स्वभावाची, ज्ञानाची सर्व माहिती परीक्षकांना होते !!!

केव्हां केव्हां मुलीला ओळखणाऱ्या कोणातरी माणसाकडे जाऊन मंडळी मुलीच्या स्वभावाविषयीं चौकशी करतात. पण त्यामुळें तरी मुलीचा खरा स्वभाव कळणें शक्य आहे कां ? आधीं रुचिवैचित्र्यामुळें ही माहिती निरुपयोगी होणार. दुसरी अडचण म्हणजे अशी कीं, साधारणपणें कोणीही अमुक मुलगी कशी आहे म्हणून आपल्याला विचारलें तर आपण मुलगी चांगली आहे म्हणून उत्तर देतों. मग त्या मुलीचा स्वभाव आपल्याला आवडत नसला तरीसुद्धां तिचें लग्न जमत असलें तर आपण कशाला मोडता घालावा असा पोक्त विचार आपल्या मनांत येतो. मग या असल्या माहितीचा फायदा काय ?

बाकीच्या गोष्टी जमल्यावर मुलीचा स्वभाव आपला निघेल तो निघेल अशीच बहुतेक वरपक्षीयांची प्रवृत्ति असते. मुली लहान वयाच्या असतां एक वेळ या प्रश्नाकडे दुर्लक्ष केलें तरी चालेल; पण आतां मुलींचीं प्रौढ वयांत लग्नें होत असल्यामुळें या प्रश्नाकडे लक्ष पुरवणें अत्यावश्यक झालेलें आहे; कारण मोठया मुलींचा स्वभाव परिपक्क झालेला असतो. लहान वयाच्या मुलींचा स्वभाव पतीला अनुरूप असा बनूं शकेल; परंतु स्वभाव पक्का बनल्यावर आपल्या पतीच्या सुखासाठीं आपल्या आवडीनिवडी आणि आपलें ध्येयसुद्धां बदलण्याची प्रेमळ पत्नीची इच्छा असली तरी तिला तें शक्य होईल कां ? सोनें तापलेलें असेपर्यंत त्याला वाटेल तो घाट देतां येईल, पण तें निवून कठीण झाल्यावर त्याचा घाट बदलतां येईल कां ? पत्नीला आपल्या आवडीनिवडी मुळींच बाजूला सारतां येतील; पण तें करण्यांत तिला आपल्या सुखाचा यज्ञ करावा लागेल. संसाराचा बोजवारा व्हायला नको म्हणून विरोधी स्वभावाच्या समंजस पतिपत्नींना पुष्कळ वेळां आपल्या सुखाची आहुति द्यावी लागते. पण म्हणून त्याला कांहीं सुखाचा संसार म्हणतां येत नाहीं.

आतां पतिपत्नींचें कितीही स्वभावसाम्य असलें तरी त्यांच्यांत कांहीं बाबतींत थोडासा मतभेद हा होणारच. पण त्या वेळीं परस्परसुखासाठीं दोघांनीही थोडें थोडें मागें घ्यायचें यांत खरी मजा आहे. अशा पतिपत्नींचा संसार सुखावह होणारच. या संसाराला आदर्शभूत संसार म्हणायला कांहींच हरकत नाहीं.

इतका वेळ प्रचलित वधूपरीक्षेंतील दोष मी दाखवले. पण शालिनी, आतां माझ्यासमोर असा प्रश्न आहे कीं आपली ही जी मुलगी दाखवण्याची चाल आहे ती चाल असतां वराला मुलीच्या स्वरूपाखेरीज दुसऱ्या गोष्टी पाहतां येणार कशा ? पूर्वी कधींही न पाहिलेली मुलगी पांच मिनिटें पुढें येऊन बसली असतां ती कितपत सुरेखनिरेख आहे याखेरीज इतर गोष्टी त्याला कशा कळणार ?

याला उपाय म्हणजे आधींच ज्या वधूवरांना एकमेकांचा स्वभाव उत्तम रीतीनें समजलेला आहे अशानींच लग्न करणें. मुलांमुलींची चांगली ओळख असल्याखेरीज स्वभाव ज्याअर्थी कळणें शक्य नाहीं आणि अनुरूप वधूवरें असल्याखेरीज संसारांत सुख लाभणें शक्य नाहीं, त्याअर्थी मुलांमुलींची चांगली ओळख असली पाहिजे असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं.

पण शालिनी, आपल्या समाजांत स्त्रीपुरुषांची ओळख होणें फार कठीण आहे नाहीं ? आपले लोक असे कुत्सित आहेत आणि स्त्रियांविषयीं त्यांचे विचार अजूनही [ आम्ही सुधारलेले असें हे आपल्याला म्हणवून घेतात म्हणून हो. ] इतके अनुदार आहेत कीं पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रिया समाजांत मिसळलेल्यासुद्धां त्यांना पहावत नाहींत. मग एकत्र बसून मोकळ्या मनानें स्त्रीपुरुषांत संभाषण कसें होणार ?

तसेंच एकाद्या मुलाची एकाद्या मुलीशीं मैत्री झाली कीं त्यांचें लग्न ठरवून लोक पार मोकळे होतात. मग दहा वेळां जरी तिच्या बाबतींत लोकांची फजिती झाली तरी पुन्हां नाक वर करून चालायला यांना कांहींच वाटत नाहीं. मुलांमुलींतील मैत्री पवित्र असणें शक्यच नाहीं अशी त्यांची समजूत

असते. अर्थात् ती त्यांच्या हलक्या मनाचीच निदर्शक आहे; पण दुर्दैवानें आपला बहुजनसमाज असल्याच मनाचा असल्यामुळें आपल्यावर निंदेचे शेंतोडे उडायला नकोत म्हणून कित्येक समाजभीरु मुलामुलींची ओळख होण्याचे प्रसंग आले तरी टळतात.

शालिनी, ही आपल्या हल्लींच्या सुशिक्षित समाजाची स्थिती आहे. आश्चर्यकारक गोष्ट आहे नाहीं ग ? पण तरी ती खरी आहे. तेंच अशिक्षित लोकांकडे पाहिलं तर काय दिसतें ? मराठमोळ्यांत स्त्रीपुरुष अगदीं खुशाल एकमेकांत मिसळत असतात. रस्त्यानें चालत असतांनासुद्धां स्त्रीपुरुषांनीं परस्परांकडे शत्रुत्वाच्या भावनेनें पहायचें हें त्यांच्यामध्यें आढळत नाहीं. हा पुरुष आणि ही स्त्री अशी भावनाच मुळीं त्यांच्या मनांत नसते त्यांचीं मनें निर्दोष असतात. स्त्रियांच्या हक्काबिक्कांची बोलणीं त्यांच्यांत नाहीं कधीं ऐकायला येत; पण स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें समाजांत मिसळून कामें करीत असतात. म्हणजे काय कीं इतर बाबतींत जरी हे लोक अशिक्षित असले तरी या बाबतींत ते सुशिक्षितांपेक्षांही सुधारलेले आहेत. तुला कसें वाटतें ?

इतक्या मोकळेपणानें जर आपल्या मुलगेमुली एकमेकांशीं वागूं लागतील तरच त्यांना एकमेकांच्या स्वभावाची नीट ओळख करून घेतां येऊन आपल्या अनुरूप वधूवरांची निवड करतां येईल आणि त्यांची निवड जर उत्तम झाली तरच त्यांना संसार सुखाचा वाटेल. अस्तु. क. लो. ही वि.

तुझीच **नलिनी.**

---

## ५

शालिनीस सप्रेम नमस्कार वि. वि.

तूं आपल्या मागल्या पत्रांत अगदीं गोंधळून जाऊन मला विचारले आहेस कीं, "पाश्चात्त्यांचा प्रीतिविवाहाचा गोंधळ आपल्या डोळ्यासमोर असूनही त्यांचाच कित्ता आपण गिरवायचा कीं काय ? कारण वधूवरांनीं एकमेकांचीं

निवड करायची असें म्हटलें म्हणजे त्याला प्रीतिविवाह हेंच नांव योग्य. ”

मी म्हणतें येवढें प्रीतिविवाह या शब्दात धास्ती वाटण्याजोगें काय आहे ? मला तर प्रीतिविवाह संमत आहे. आतां पाश्चात्त्यांमध्यें भराभर जे घटस्फोट होत आहेत तें कांहीं प्रीतिविवाहामुळें नव्हें. लग्नापासून दोनतीन वर्षांतच ज्या पतिपत्नींनां एकमेकांचा कंटाळा येतो त्याला काय तूं प्रीतिविवाह हें नांव देतेस ?

मी कांहीं त्याला प्रीतिविवाह म्हणणार नाहीं. त्याला विकारविवाह हें नांव योग्य आहे. एकमेकांच्या अंतरंगसौंदर्यानें मोहून जाऊन केलेल्या विवाहालाच फक्त प्रीतिविवाह म्हणतां येईल.

घटस्फोटाकडे पोंचविणारे जे विवाह ते बहिरंगावर मन भुलून गेल्यामुळें झालेले असतात. आपल्याकडे सध्यां जे विवाह होत आहेत ते याच मासल्याचे आहेत. घाबरून जाऊन प्रीतिविवाह हें नांव ज्यांना देणें योग्य ते प्रीतिविवाह सध्यां आपल्यांत चालू आहेत. आतां घटस्फोटाकडे पोंचविणारे असें म्हणतां येत नाहीं; याचें कारण आपल्याकडे घटस्फोटच होत नाहीं. बाकी खरी स्थिती दोघांची सारखीच आहे. विकारांचें प्राबल्य संपून विचाराला वांव सांपडला म्हणजे भिन्नस्वभावांच्या पतिपत्नींना एकमेकांचा कंटाळा यायचाच. मग दोघांनीं जरी शहाणपणानें दुसरी कांहीं गत नाहीं म्हणून तसेंच पटवून घेतलें तरी खरें तें विजोडच जोडपें म्हणायचें.

उलट अनुरूप वधुवरें असल्यावर त्यांना एकमेकांचा कंटाळा येणें शक्यच नाहीं. एकमेकांच्या गुणांवर प्रेम असल्यानें तें चिरस्थायी असतें. त्यांत विकारवशतेचा भाग नसल्यामुळें त्याची गोडी कमी होण्याची भीति बाळगण्याचें कारण नाहीं. पावसाळ्यांत सांचलेलें डबक्यांतलें पाणी पाऊस संपतांच आटून जातें; परंतु डोंगरावरून सतत वाहणारा निर्मल पाण्याचा झरा हळूं हळूं मोठा होत जाऊन त्याला अथांग नदीचें स्वरूप प्राप्त होतें. विकारवशतेबरोबरच खोट्या प्रेमाचा लय होतो; पण खरें प्रेम उत्तरोत्तर वृद्धिंगत होतें. अशा

प्रेमानें बद्ध झालेलीं पतिपत्नी, परस्परसुखासाठीं आत्मसमर्पण करूं लागलीं म्हणजे सुखसर्वस्व त्यांच्या हातीं लागायचेंच.

मग शालिनी, आतां सांग बरं असले प्रीतिविवाह आपल्याकडे हवेत कीं नकोत तें. कां अजूनही प्रीतिविवाह या शब्दाची तुला भीति वाटते ? तुला खरें काय वाटतें तें सांग हं. क. लो. अ. ही. वि.

तुझीच नलिनी.

---

६

शालिनीस सप्रेम नमस्कार वि. वि.

तुझें पत्र पोंचलें. माझ्या म्हणण्याप्रमाणें जर उच्च दर्जाची निवड होऊं लागली तर खरोखरच उत्तम होईल असें तुझें मत तूं मला कळवलें आहेस. प्रीतिविवाहाला तूं कांहीं आतां भीत नाहींस हें ऐकून आनंद झाला; पण तूं म्हटलें आहेस कीं, उत्तम निवड करण्याजोग शहाणपण तरी किती जणांच्या अंगीं असतें आणि खरा स्वभाव तरी किती जणांना कळतो ? तसेंच खरें प्रेम आणि विकारवशता यांतला फरकसुद्धां कळणारे फारच थोडे असतात. आणि पाश्चात्यांतील गोंधळ त्यामुळेंच दृष्टीस पडतो.

कबूल आहे. चांगल्याप्रमाणें वाईट हें यायचेंच. पण वाईटावाईटांतसुद्धां कमीअधिकपणा असतो ना ? पुष्कळ लहरी मारीत असलेल्या एकाद्या रेशमी वस्त्रांत मुख्य रंग कोणता हें ठरवावयाचें असलें तर डोळे मिटून धरणारापेक्षां ते उघडे ठेवणारा सत्याच्या अधिक जवळ जाईल. त्याचप्रमाणें मुळींच स्वभावाकडे नीट लक्ष न देतां नशिबावर हवाला ठेवण्यापेक्षां स्वभावाकडे नीट लक्ष दिल्यानें चुकी होण्याचा संभव तितकाच कमी होईल.

खरें बोला म्हणून नीतिशास्त्रांत सांगितलेलें आहे. मग कितीजण खरें बोलतात ? पण म्हणून खरें बोला असें सांगितल्यामुळेंच लोक खोटें बोलतात असा सिद्धांत ठोकून द्यायचा कीं काय ?

असो. शालिनी, आज तुला मी विमलेची हकिगत सांगणार आहें.

विमला अठरा वर्षांची असून दिसण्यांत बरीच चांगली आहे. ती सध्य इंग्लिश पांचवींत आहे. तिला चार वर्षे स्थळें पहात आहेत. पण तीं कसलीं? तर श्रीमंत वयस्क, पहिलीं मुलें असलेल्या वरांचीं. परवां तर एक जवळजवळ पन्नाशीला आलेला गृहस्थ तिला पहायला आला. त्यामुळें विमला खूप चिडली, आणि विचारलेल्या एकही प्रश्नाचें तिनें उत्तर दिलें नाहीं. मुलगी घाबरली आहे म्हणून तिच्या वडिलांनीं वेळ मारून नेली; पण मागून तिला खूप बोलले. विमलेनें त्यांना सांगितलें कीं, मला म्हाताऱ्याशीं कांहीं लग्न करायचें नाहीं. मग मुलगा गरीब असला तरी मला चालेल.

त्यावर तिच्या वडिलांनीं तिला चक्क सांगितलें कीं, गरिबाशीं लग्न करून नंतर तुझें जर कांहीं बरेंवाईट झालें तर आम्हाला तुला पोसायला ऐपत नाहीं. आणि लहान वयाच्या श्रीमंत मुलाच्या डोंबल्यावर घालायला आमच्यापाशीं पैसेही नाहींत.

विमला त्यावर गप्प बसली. बाबांनीं इतके मोठाले मुलगे पाहूं नका वगैरे पुष्कळ तिच्या वडिलांना सांगून पाहिलें पण शेवटीं त्या माणसाशीं बोलण्यांत कांहीं अर्थच नाहीं असें पाहून त्यांनीं बोलणें सोडून दिलें. आणि शेवटीं त्या गृहस्थानें आपला शब्द खरा केला. त्या पन्नास वर्षांच्या म्हाताऱ्याशीं विमलेचें लग्न ठरलें आहे. आठ दिवसांतच लग्न व्हायचें आहे. लग्नाचा दोहीं अंगचा खर्च वराकडूनच होणार आहे. विमला बिचारी सारखी रडत बसते. तिची समजूत तरी मी कशी करूं?

शालिनी, काय ग ही आपल्या मुलींची स्थिति? मला वाटतें विमलेच्या भावाला चांगली दहापंधरा हजारांची इस्टेट खास मिळेल. मग विमलेसाठीं त्यांनीं दोन तीन हजार रुपये खर्चले असते तर काय बिघडलें असतें? (हुंड्याविषयीं पुढील पत्रांत लिहिणार आहें.) आणि जन्मभर जरी तिला पोसावी लागली तरी मुलगा तशीच त्याची ती मुलगी, मग मुलगी पोसण्याचें येवढें आईबापाना संकट पडतें तें निसर्गनियमानुसार असेल कां ग?

लग्न होईपर्यंत मुलीला पोसायची येवढेंच काय तें मुलीच्या बाबतींत

आपलें कर्तव्य असें आईबापाना वाटतें. म्हणून एकदां कशी तरी तिची धिंडका घरांतून काढली कीं यांना हुश्श करीत बसायला मोकळीक. आणि दिवसेंदिवस पहावें तों हे म्हातारे श्रीमंत नवरेच आईबापाना फार आवडूं लागलेले दिसतात. नशीब आमच्या मुलींचें !

तुमच्याच घरांत लग्न करूं असें विमलेचे वडील म्हणत होते; पण बाबानीं त्यांना सांगितलें कीं, हें लग्न आम्हाला कांहीं पसंत नाहीं. माझ्या घरांत बाप आपल्या मुलीच्या सुखावर पाणी सोडीत असतांना मला पहावणार नाहीं. तेव्हां माझ्या येथें हें लग्न नको. आणि आम्ही कोणी लग्नालाही येणार नाहीं.

असल्या पशूंना समाज वाळींत कां ग टाकीत नाहीं ? आणि वधूवरांत फार तर दहा बारा वर्षांचें अंतर असावें असा कायदा कां होत नाहीं ? कळावें. ही वि.

तुझीच **नलिनी.**

---

७

शालिनीस सप्रेम नमस्कार, वि. वि.

शालिनी, काल एक विशेष प्रकारची गोष्ट घडून आली. बाबानीं आपल्या खोलींत मला बोलावून " तुला लग्न करावयाचें आहे ना ? " म्हणून विचारलें.

हा अनपेक्षित प्रश्न ऐकून मी एकदम गोंधळून गेलें. अनपेक्षित म्हणजे त्या वेळीं अनपेक्षित. बाकी केव्हां तरी लवकरच हा प्रश्न माझ्यासमोर उभा रहाणार हें मला माहीत होतें. त्यावर उत्तरही पण मी योजलेलेंच होतें.

मी हो म्हटलेलें ऐकून बाबांना समाधान वाटलेंसें दिसलें. मग ते म्हणाले, " आमची तशी कांहीं गर्दी नाहीं. चांगलें स्थळ मिळालें तर उरकून घेऊं. नाहीं तर शिकणें चालू आहेच. "

त्यालाही मी होय म्हटलें. नंतर बाबानीं विचारलें कीं, " अमूक अमूक आय. सी. एस. नुकतेच येथें आले आहेत. ते मुली पहाताहेत. मी पांच

हजारांपर्यंत हुंडा देणार आहें. आणि वेळ आल्यास आणखीसुद्धां दोन हजार देईन. मग काय करूं कां तिथें खटपट ? ”

तेव्हां मी बाबांना चक्क सांगितलें कीं आय. सी. एस. शीं मला लग्न कर्तव्य नाहीं.

बाबाना हें ऐकून जसें आश्चर्य वाटलें तसेंच तुलाही वाटत असेल ना शालिनी ? कारण हल्लीं कॉलेजमधल्या मुली “ इंग्लंड रिटर्न्ड ” लोकांसाठीं नुसत्या टपून बसलेल्या असतात. शालिनी, रागावूं नको हं. कदाचित् तुझीही तीच महत्त्वाकांक्षा असेल.

बाबाना वाटलें मी थट्टेनेंच बोलत आहें. म्हणून त्यांनीं हंसतहंसत विचारलें, “ त्याच्याबरोबर एकादा पांढरा हत्ती असेल म्हणून घाबरलीस कां काय ? ”

आमच्या बोलण्याला गंभीरपणाचें स्वरूप न येतां विनोदाचें आलें हें पाहून मला जरा मोकळें वाटूं लागलें. मीही हंसतच म्हटलें “ ती भीती तर आहेच. पण दुसरेंही त्याला एक कारण आहे. मला हुंडेखाबूशीं कांहीं लग्न करावयाचें नाहीं. जो हुंडा मागितल्याशिवाय केवळ माझ्यासाठीं माझ्याशीं लग्न करायला कबूल होईल त्याच्याशींच मी लग्न करीन. ”

बाबांचा चेहरा गंभीर झाला. “ हुंड्याशिवाय तुला चांगलें स्थळ मिळणें जरा कठीणच आहे. ” ते म्हणाले.

“ पण तसें जर स्थळ मिळालें नाहीं तर त्या सात हजार रुपयांत मीच इंग्लंडला जाऊन डॉक्टर होऊन येईन. आणि बाबा, माझी आणखी एक अट आहे. मी “ दिसायला ” कुठेंही जाणार नाहीं. ती रानटी चाल मला अगदीं आवडत नाहीं. तसेंच मला ज्याचा स्वभाव पसंत पडेल त्याच्याशींच लग्न केल्यानें मला सुख होईल. ”

बाबा थोडा वेळ स्तब्ध बसले. मग त्यांनीं विचारलें. म्हणजे तुला प्रीति-विवाह संमत आहे कीं काय ? ”

त्यावर मी मानेनेंच होय म्हणून उत्तर दिलें. पण शालिनी, माझ्या

उत्तरानें बाबा बिलकूल रागावले नाहींत बरं. ते म्हणाले, "कांहीं हरकत नाहीं. मोठ्या मुलांमुलींनीं स्वतः निवड करावी हेंच उत्तम. पण नलिनी, यांत तुझ्यावर केवढी जबाबदारी पडत आहे हें तुला माहीत आहे ना?"

असें म्हणून मी तुला मागल्या पत्रांत वधूवरांनीं निवड कशी करावी यावर जें लिहिलें आहे तेंच त्यांनीं मला सांगितलें. मी तें सर्व ऐकून घेतलें. शालिनी, मला जरी तें सर्व ठाऊकच होतें, तरी बाबा इतके कळकळीनें उपदेश करीत होते कीं मला त्यांचें बोलणें ऐकावेसेंच वाटत होतें. आणि माझ्यावर जबाबदारी येणार हें मला पूर्वी कळलेलें असून त्यांच्या बोलण्यानें ती जबाबदारी मला दुप्पट झाल्यासारखें वाटूं लागलें. त्यांचें बोलणें संपल्यावर मी त्यांना सांगितलें कीं, "मी जरी स्वतः निवड केली तरी तुमच्या संमती-वांचून कांहीं मी लग्न करणार नाहीं."

हें ऐकून बाबाना अतिशय समाधान वाटलें. ते सद्गदित होऊन म्हणाले, "नलिनी, तुम्ही मुलें सुखी झालां म्हणजे त्यांतच आमचा आनंद आहे. तूं जर शहाणपणानें निवड केलीस तर मी कधींही तुला नको म्हणणार नाहीं."

हें बोलतांना बाबांच्या डोळ्यांत पाणी आलें. ते एकदम तेथून निघून गेले. बाबांनीं माझें म्हणणें कबूल केलें म्हणून मला त्यांचे उपकार वाटले. शालिनी, सगळेच आईबाप आपल्या मुलांमुलींवर जर असें खरेंखुरें प्रेम करतील आणि त्यांच्या सुखाविषयीं कळकळ बाळगतील तर किती ग चांगलें होईल? आईबाप आपल्या मुलांवर प्रेम करीत नाहींत असें नाहीं मी म्हणत. पण केव्हां केव्हां असमंजसपणानें आपल्या मुलांना अमुक रीतीनें सुख होईल असें वाटून आईबाप अमुकच तऱ्हेनें वाग असा हट्ट धरून बसतात, आणि मुलांच्या दुःखाला कारणीभूत होतात. लग्नाच्या बाबतींत तर असे प्रकार फार होतात. आणि ती बाबत तर इतकी महत्वाची आहे कीं तिच्यावर मुलांचें व मुलींचें जन्माचें सुखदुःख अवलंबून असतें. म्हणून आईबापांनीं लग्नाच्या बाबतींत जरा लगाम सैल सोडला पाहिजे.

असो, मी आतां हुंडेखाबू लोकांविषयीं आणखी माझे विचार तुला कळवणार आहे. हुंडा घेणें किती वाईट आहे यावर पुष्कळ चर्चा झाली आहे; पण त्याचा कांहीं उपयोग झाला आहे कां ? कांऽहीं नाहीं. स्नेहलतेच्या आत्मयज्ञापासून लोकांना हुंडा घ्यायची जरा लाज वाटूं लागली होती, पण आतां या "इंग्लंड रिटर्न्ड" लोकांनीं मन मानेल तो हुंडा घ्यायला सुरुवात केली आहे. असें शहाणपण घेऊन आलेले लोक जर राजरोसपणानें हुंडा घेतात, तर मग आम्हीं तरी कां घेऊं नये, असें म्हणून इतर लोक हुंडा चापतात. आतां हुंडा न घेणें हीच बावळटपणाची गोष्ट झाली आहे.

दहा वर्षांपूर्वीं हजारभर हुंडा म्हणजे तोंडभर रक्कम होत असे. आतां गरीब सुद्धां हजाराखालीं बोलत नाहींत. आतां तीन हजार म्हणजे साधारण हुंड्याची रक्कम झाली आहे. पण या "इंग्लंडरिटर्न्ड"नीं आपला भाव इतका वाढवून ठेवला आहे कीं दहा हजार, पंधरा हजार होतां होतां आतां चाळीस हजारांवर बोलणें येऊन बसलें आहे. "काय * * * राव तुम्हांला तीस हजार देताहेत ना. आम्हीं चाळीस हजार देतों." * * * म्हणतात, "बरं बुवा तुमची मुलगी करूं."

शालिनी, हें मजेचे लिहिणें नाहीं बरं. अगदीं असल्या प्रकारची लिलांवी लग्नें झालेलीं मी ऐकलीं आहेत. काय हा हुंडेखाबूपणा !

पण देणारे लोक तरी आचरट नव्हेत कां ? आणि आपली किंमत उतरवून घेऊन लग्न करायला मुली तरी कशा कबूल होतात कोण जाणे ! या अवाच्यासवा हुंड्याच्या रकमा घेऊन साध्या लोकांनासुद्धां आतां अधिकाची तहान लागूं लागली आहे. पुन्हां शिकलेले सुधारलेले लोक नांवें ठेवतील याची भीति बाळगायला नको. हो. ज्यांनीं लोकांना शहाणपण शिकवायचें त्यांनींच शेण खाल्ल्यावर लोकांनीं खाल्लें तर त्यांत हंसायचें कोणी कोणाला ?

पण हें शेण खाणें कांहीं पौष्टिक नाहीं असें माझें प्रामाणिक मत आहे. यासाठीं मला एक उपाय सुचतो आहे. मालाचा भाव फार चढला म्हणजे त्याला कोणी मागणीच करूं नये. मागणी आली नाहीं कीं भाव चट उतरतो

ही व्यापारांतली अनुभवसिद्ध गोष्ट आहे. म्हणून हुंडेखाबू लोकांवर मुलींनीं जर थोडे दिवस बहिष्कार घातला तर त्यांची किंमत आपोआप उतरेल. मी आपल्या कॉलेजच्या सगळ्या मुलींना हें तत्त्व पटवून देण्याची खटपट करीत आहें. शालिनी, तुलाही माझी अशी विनंति आहे कीं, हुंडेखाबूशीं तूं लग्न करूं नको. मुलींपैकीं किती जणी कबूल होतील तें पहाणें आहे. फारशी कांहीं आशा नाहीं; कारण "इंग्लंडरिटर्न्ड" शिवाय दुसऱ्या कोणाशीं लग्नच करावयाचें नाहीं अशी कित्येक जणींनीं आपल्या मनाशीं प्रतिज्ञा केलेली असेल. 'इंग्लंड रिटर्न्ड' न मिळाल्यामुळें अविवाहित राहिलेल्यासुद्धां दोन तीन मुली मला ठाऊक आहेत.

या हुंडेखाबू लोकांविरुद्ध एकादें कायद्याचें कलम काढलें पाहिजे. बरं जाऊं दे कीं, हा विषयच पुरे.

शालिनी, येवढें लांबलचक पत्र लिहिल्याबद्दल रागावूं नको हं. आतां काहीं तुला इतक्यांत पत्र पाठवून त्रास देणार नाहीं. परीक्षा जवळ आल्यामुळें अभ्यास करणें भाग आलें आहे. परीक्षा झाल्यावर आपण काय काय मौजा करायच्या त्या मी केव्हांपासूनच योजून ठेवल्या आहेत. तुझी परीक्षा आटोपल्याबरोबर इकडे येशील ना? क. लो. ही वि.

तुझीच नलिनी.

---

## नेमधर्म : : ६

जन्माला येऊन प्राणिमात्राला जर कोणतें अत्युच्च ध्येय साधावयाचें असेल तर तें आत्मविकास करून घेणें हेंच होय. आणि हें ध्येय प्राप्त करून घेण्यासाठीं शरीर व मन हीं साधनें आहेत. अर्थात् हीं साधनें सुदृढ असल्या-खेरीज ध्येयसाधनाला तीं समर्थ होणारच नाहींत.

आत्मविकासाला साधनीभूत असें शरीर आणि मन यांना सामर्थ्यवान् बनविण्यासाठीं कित्येक उपाय सांगितलेले आहेत, त्यांमध्येंच नेमधर्म आणि उपास यांचाही अंतर्भाव होतो.

खरोखरीच हे उपाय फार उत्तम आहेत. पण केव्हां? त्यांची विचारपूर्वक योजना झाली तर!

बऱ्याच स्त्रिया बारा महिन्यांत कांहीं तरी उपास, हरितालिकेसारखीं व्रतें वगैरे करीत असतात, पण विशेषतः चातुर्मासामध्यें बहुतेकजणी कांहीं तरी नियम करतातच. या नियमांचे अनेक प्रकार आहेत. नक्त, एकधान्य, एका नियमित दिशेला तोंड करून जेवणें, पत्रावळीवर जेवणें, सुवासिनींची ओटी भरणें, परान्न न घेणें, शनिवार, गुरुवार असे उपास धरणें किंवा प्रदक्षिणा घालणें, असे नानातऱ्हेचे नियमप्रकार आहेत. ते विचारपूर्वक केल्यास अत्यंत पुण्यप्रद ह्मणजेच आत्मविकास करण्यास समर्थ असे आहेत.

कोणताही कां होईना नियम करून तो चार महिने पाळावयाला मनोनिग्रह लागतो. चंचल मन थोडेसें तरी ताब्यांत येतें. शिवाय आपण कांहीं तरी पुण्यप्रद करीत आहों या विचारानें मन सुप्रसन्न असतें. यथायोग्य रीतीनें चार महिने नियम पाळल्यावर आपल्याला इतका मनोनिग्रह करतां आला असें वाटून आपला आत्मविश्वास बळावतो, आणि अधिक मनोनिग्रह कर-ण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न होते.

मन रिकामें असलें कीं सुविचारांपेक्षां कुविचारच त्यांत अधिक धुडगूस घालीत असतात. आमच्या स्त्रियांची स्थिती अशिक्षितपणामुळें तर या

बाबतींत फारच शोचनीय आहे. त्यांना विचार करायला विषयसुद्धां नाहींत. राजकीय, सामाजिक, व्यापारधंदे, शाळा, ललितकला वगैरे बाबतींत तर काय पण धार्मिक, गृहव्यवसायासंबंधीं देखील यथायोग्य विचार करण्याची त्यांची पात्रता नाहीं. म्हणून चार बायका जमल्या कीं त्यांनीं निंदा किंवा वस्त्रालंकार यांसारख्या विषयांवर बोलावें हें ओघानेच येतें. त्यापेक्षां आपण हें पुण्यप्रद कृत्य करीत आहों अशा समजुतीनें लक्ष मोजण्यांत मन गुंतवणें हें बरेंच हितावह आहे. जप करणें, गोपद्में काढणें वगैरे गोष्टी अशांपैकींच आहेत.

पण असले नियम सुशिक्षित बायका करूं लागल्या तर मात्र तें हास्यास्पद ठरेल. नुसतें कुविचारांपासून मन परावृत्त करण्यापेक्षां तें सुविचारप्रवृत्त करणें केव्हांहि अधिक योग्यतेचें आहे. स्त्रियांनीं विवेकानंद किंवा अशींच कांहीं उत्तम पुस्तकें, इतकें कशाला नुसतें नियमानें अमुक तास कांहींतरी वाचावयाचेंच; असा जरी नियम केला तरी किती चांगले होईल ! एकदां पदवी घेतल्यावर पुस्तकांवर बहिष्कार घालणाऱ्या पदवीधर स्त्रिया नाहींत असें नाहीं.

प्रदक्षिणा घालणे हा आरोग्यवर्धक नियम आहे. मात्र प्रदक्षिणेची वाट मोठ्या फेऱ्याची, भरपूर उजेड हवेची अशी असली पाहिजे; एका पाटावर तुळशीची कुंडी ठेवून त्याभोंवतीं गिरक्या घेतल्यानें चक्कर येते. व्यायाम मुळींच होत नाहीं. दररोज असें करण्यानें किती बरें आरोग्यांत बिघाड होईल? तुळशीला प्रदक्षिणा घालूं नयेत असें मी म्हणत नाहीं. पण तुळस अंगणांत ठेवून मोठ्या घेराची प्रदक्षिणा धरल्यानेंच फायदा होईल येवढेंच मला सांगावयाचें आहे. तसेंच कित्येक स्त्रिया स्वैपाकपाणी आटोपून, घरांतील मंडळींना वाढून झांकपाक करून मग भर उन्हांत देवाला जाऊन प्रदक्षिणा घालतात. यामुळें भोंवळ येतें. उन्हामुळें डोळ्यांपुढें अंधारी येते, पाय पोळतात, डोळे बिघडतात, डोकें दुखण्याची संवय लागते, ताप येतो असे अनेक अपाय घडतात. अशा रीतीनें आरोग्य बिघडल्यावर मनोबल वाढणार कसें? सकाळीं किंवा संध्याकाळीं प्रदक्षिणा घातल्या तर मात्र फायदा होतो. दोन तीन मैलांवर असलेल्या देवाला जाण्याचा नियम जरूर करावा.

सुवासिनींची ओटी भरणें, कुमारीण जेवावयास घालणें किंवा दुसरीं दानें देणें यानें मनाचें औदार्य वाढतें पण हें दान सत्पात्रीं करण्याची खबरदारी अवश्य घ्यावी. उपयुक्त संस्थांना कोणत्या तरी रीतीनें मदत करण्याची पद्धत सुशिक्षितांनीं अंमलांत आणल्यास फार चांगलें होईल.

नियमित दिशेला तोंड करून जेवणें, देवापुढें निरंजन किंवा वाती लावणें यांत फायदा येवढाच कीं एकादी गोष्ट स्मरणपूर्वक करण्याची संवय लागावी. मोठे कष्टकर नियम नको असतील त्यांनीं हे नियम करावे.

एकधान्य खाणें किंवा सोडणें, नक्त करणें किंवा एकभुक्त रहाणें किंवा पंचामृत वर्ज करणें हे नियम त्रासाचे असतात.

अशक्त लोकांनीं नक्त करणें किंवा एकधान्य खाणें अशासारखे कष्टकर नियम मुळींच धरूं नयेत. नाहींतर कांहीं फायदा होण्याऐवजीं शरीरारोग्य ढांसळून मागून पश्चात्ताप करण्याची पाळी यावयाची. मग मन सुदृढ व्हावयाचें लांबच राहून उलट दुर्बल बनेल.

नियम धरण्याच्या बाबतींत स्त्रिया कित्येक वेळां निवळ चुरशीनें वागतात. अमकीनें नक्तें धरलीं म्हणून मलाहि तीं केलींच पाहिजेत असें वाटून नियम धरणें किंवा चार मैत्रिणींनीं उत्साहाच्या भरांत एकच नियम धरावयाचा असें बरेच वेळां घडतें. असें भरीं भरल्याप्रमाणें नियम धरूं नयेत. आपली प्रकृति, परिस्थिति या सर्वांचा विचार करून मगच नियम धरावा. मध्येंच नियमभंग केल्यानें आत्मविश्वास कमकुवत होतो, म्हणजेच पाप लागतें.

नक्त म्हणजे फक्त रात्रीं जेवणें आणि एकधान्य खाणें म्हणजे गहूं, तांदूळ किंवा असेंच कोणतेंतरी एक धान्य खाऊन रहाणें, हे नियम फारच कठिण आहेत. यामुळें मनोनिग्रह फारच बळावतो. म्हणूनच हे फार पुण्यप्रद गणले आहेत. आरोग्य बिघडणार नाहीं अशी खात्री असेल तरच हे नियम करावेत. पूर्वींच्या स्त्रिया फारच कणखर होत्या. पंचवीस माणसांचा संसार आवरून देखील असले नियम त्या सहज करून टाकीत, पण आतां हे नियम आपल्याला साधणार नाहींत.

यापेक्षां परान्न वर्ज करणें, एकभुक्त रहाणें, निर्जळी एकादशी किंवा एकाद्या वारीं उपास करणें हे नियम जरा सोपे आहेत. आणि सोपे असून पुन्हां फारच आरोग्यवर्धक आणि मनोबल वाढविणारे आहेत.

आरोग्यरक्षणासाठीं ज्याबद्दल अतिशय काळजी घ्यावयास पाहिजे, पण केवळ जिव्हालौल्यामुळें आपण ज्या बाबतींत अत्यंत निष्काळजी रहातों, असें कांहीं असेल, तर खाणें पिणें. या बाबतींत मन आवरणें महाकठिण असतें. म्हणूनच खाण्यापिण्याविषयीं प्रतिबंधक असे नियम पुष्कळ आहेत. शरीर-पोषणाला जितकें अन्न लागतें, त्यापेक्षां आपण किती तरी अधिक खात असतों. सकाळीं एकदां जेवणें यांत कांहीं मोठेसें कठीण नाहीं.

परान्न वर्ज करण्यांतही मोठा अर्थ आहे. आपण दुसऱ्यांकडे जेवावयास जातों, तें कांहीं तरी कारणानेंच जातों. तेथें घरचें साधेसुधें अन्न नसून, बहु-तेक जडान्नच असतें. जडान्नानें प्रकृती बिघडवून घेण्यापेक्षां चार महिने तरी तें वर्ज झालें तर चांगलेंच. शिवाय परद्रव्यच काय पण स्वकष्टानें पुनीत झालें नाहीं असें परान्नसुद्धां आपण घेऊं नये असें शिकविण्याचा त्यांत हेतु आहे.

तिथिपालन हाही एक नियम आहे. प्रत्येक तिथीला मीठ, तेल, खोबरें, आंबट पदार्थ व अशासारखे आणखी कांहीं पदार्थ यांपैकीं एकेक जिन्नस वर्ज करावयाचा असतो. या नियमानें तिखटमिठाच्या अरबटचरबट पदार्थांना थोडासा आळा बसतो.

असले कित्येक नियम आहेत. त्यांतील कांहीं उत्तम, कांहीं मध्यम व कांहीं कनिष्ठ दर्जाचे आहेत. ज्यांना जे साधतील त्यांनीं ते करावे. कोणताही नियम केला तरी थोडातरी निर्बंध येतोच. ज्यामुळें अधिक आरोग्यवर्धन आणि मनोबलवर्धन होईल तो नियम अधिक चांगला!

स्त्रिया नियम धरतांना आणखी एक चूक करीत असतात. धड एक ना भाराभर चिंध्या त्याप्रमाणें चारचार पांचपांच नियम एकेक स्त्री धरीत असते. एकधान्य करून पुन्हां नक्तें करावयाचीं आणि त्यांत सोमवार, शनिवार, एकादशा करून पुन्हां तुळशीला प्रदक्षिणा अशासारख्या गोष्टींची भर घालतात.

यामुळें केव्हां केव्हां दोन दोन दिवस जेवण मिळत नाहीं. याप्रमाणें देहाला कष्टवून काय बरं फायदा ? मग "हा मेला चातुर्मास संपतो तरी केव्हां आणि मी या कटाकटीमधून निभावतें कशी ?" अशी मनःस्थिति झाल्यावर मनाची प्रसन्नता जाऊन नियम करण्यांत हौस तर मुळींच रहात नाहीं. मन त्रासिक बनतें. म्हणजे अर्थातच तें दुर्बल होतें. अशा अनेक नियमांच्या सुऱ्या आपल्या डोक्यावर लटकत ठेवूं नयेत.

पुष्कळ नियम कोणी कधींच करूं नयेत असें मात्र नव्हे हो. पण आधीं सोप्या नियमांपासून सुरवात करून अधिकाधिक कठीण नियमांनीं शरीर व मनोबल वाढवून मग दुःसाध्य नियम खुशाल करावेत. नंतर ते नियम करतांना शरीर जरा थकलें तरी मनःसामर्थ्य फार वाढतें. नियम संपल्यावर पुन्हां शरीरसामर्थ्य परत मिळवितां येतें. महात्माजींनीं उपास करून, अन्नांत बदल करून कित्येक प्रकारें मनोनिग्रह केला. थोडे दिवस त्यांचें शरीर अशक्त झालें तरी मन अधिकाधिक सामर्थ्यवान् बनलें. पुन्हां आपलें तें ताजेतवानें होऊन कार्य करायला तयारच ! चार महिनेच नव्हे तर वर्षानुवर्षे निरनिराळे नियम करून मनोनिग्रह वाढवून त्यांनीं आत्यंतिक आत्मविकास केला म्हणूनच त्यांना महात्मा ही पदवी लाभली.

चार महिने तर नियम करावेतच, पण पुढें वर्षानुवर्षे नियम टिकवितां यावेत ही महत्त्वाकांक्षा हृदयांत असली पाहिजे.

पुरुषांनीं नियम तर अगदीं सोडूनच दिले आहेत ! हें कांहीं योग्य नाहीं. तीच स्थिती सुशिक्षित स्त्रियांची आहे. त्या पण नियम वगैरे न धरतां यथेच्छ वागत असतात. विचार केल्यास जुन्या नियमांत सुशिक्षितांनीं पाळण्याजोगे कितीतरी नियम आहेत. आठवड्यांतून शनवार किंवा दुसरा एखादा वार धरणें किंवा एकादशी करणें (म्हणजे उपासाचे चमचमित पदार्थ दुप्पट खाऊन नव्हे हं). तसेंच पंचामृत सोडणें किंवा एकभुक्त राहणें हे नियम चांगले आहेत. मानसपूजेचा नियम तर सर्वोत्कृष्ट आहे. देवाची नाहीं तर

निदान एकाद्या विभूतीची मानसपूजा अवश्य करावी. मनाची एकाग्रता वाढवण्यास मानसपूजेसारखा नियम नाहीं.

सुशिक्षितांनीं जुन्या नियमांत, साष्टांग नमस्कार, प्राणायाम, आसनें, वाचन, ज्ञानदान करणें किंवा दुसऱ्या कांहीं प्रकारें समाजसेवा करणें, असल्या नियमांची भर टाकावी.

पण चार महिनेच कां होईना, कोणता तरी आत्मविकासक्षम नियम प्रत्येकानें जरूर करावा.

---

## मुलींचा वारसाहक्क : : ७

( स्त्रीमासिकाच्या १९३५ सालच्या फेब्रुवारी अंकांत सौ. लक्ष्मीवहिनी या सहीखालीं एक पत्रस्वरूपाचा लेख प्रसिद्ध झाला होता. त्या लेखांत वरींच प्रमाणें देऊन मुलींना वारसाहक्क मिळूं नये, त्यांना फक्त सासरच्या मालमत्तेंत अधिकार असावा असें मत प्रतिपादिलेलें होतें. त्या प्रश्नाला उत्तर म्हणून खालील लेख एप्रिल महिन्यांत स्त्रीमासिकांत प्रसिद्ध झाला. )

ती. सौ. लक्ष्मीवहिनींना सप्रेम नमस्कार वि. वि.

तुमचें पत्रोत्तर वाचलें आणि क्षणभर वाटूं लागलें कीं, खरंच आपल्या विचारांची दिशा चुकली तर नाहीं ना? कायद्याच्या पेढीवर खरोखरीच प्रेमाची आहुती पडेल कीं काय असा मनाचा गोंधळ उडून गेला आणि श्रीकृष्ण – द्रौपदीच्या बंधुभगिनीप्रेमाच्या वहाराच्या कल्पनांबरोबर तरंगत तरंगत माझें मन अगदीं त्रेतायुगांतच रमून गेलें पण तितक्यांतच स्वैपाकीण-बाईनीं माझ्या खोलींत प्रवेश केल्यामुळें धक्क्यासरशीं मी कलियुगांत विसाव्या शतकांत येऊन थडकलें. वहिनी, 'शंपं थद्द्या पूरयेत्' तसं नाहीं हो हें!

आमच्या स्वैपाकीणबाई मथुताई यांना एक सोडून दोन भाऊ आहेत. ते

भाऊ चांगल्या प्रकारें आपल्या बायकांमुलांचें कुटुंब पोशीत आहेत. असें असतां त्यांच्या बहिणीला पोटासाठीं दारोदार कां हो भटकावें लागतें आहे? वैधव्यावस्थेमध्यें बहिणींना जवळ करणारे भाऊ थोडेच असतात नव्हे का?

पण हेंच कशाला? वहिनी, श्रीकृष्णानें द्रौपदीच्या धावण्या धावल्या. तिला वस्त्रें पुरवून तिची लाज राखली, कबूल आहे; पण तीच द्रौपदी जर श्रीकृष्णाला असें म्हणाली असती कीं "भाऊराया, मला एकाऐवजीं पांच पति आहेत खरे, पण ते सर्व नादान आहेत. पत्नीपेक्षां त्यांना जुगाराची किंमत अधिक वाटते. अशा स्थितींत मी त्यांच्याजवळ मुळींच राहणार नाहीं. त्यांचें तोंडदेखील पाहूं नये असें मला वाटतें. तेव्हां तूं मला तावडतोब द्वारकेला घेऊन चल. मी आपली जन्मभर तुझ्याजवळ राहीन." तर मग त्या भाऊरायानें काय केलें असतें? मग श्रीकृष्णानें आपलें सुदर्शन सरसावून आपल्या लाडक्या बहिणीचें शिर धडावेगळें केलें असतें किंवा स्त्रीहत्येचें पातक आपल्या हातून घडूं नये म्हणून फक्त पतिव्रतेला अनुचित असे शब्द उच्चारणारी द्रौपदीची जिभली त्यानें छाटून टाकली असती आणि शिवाय रौरव नरकांत तिला एखादी जागा रिझर्व्ह करून ठेवून पंडुकुल, द्रुपदकुल आणि आपल्या मानीव नात्याकरितां यदुकुल अशा तिन्ही कुलांचा उद्धार केला असता. वहिनी, खरें ना हें?

म्हणजे काय कीं, बहीण जोंपर्यंत पतीबरोबर संसाराची सप्तपदी चालत आहे तोंपर्यंत भाऊ बहिणीच्या पाठीशीं उभा असतो. पण ती चाल चुकली कीं भाऊ पाठमोरा झालाच. मग त्यांत बहिणीची चुकी असो किंवा नसो.

हें माझें म्हणणें पडताळून पहावयाचें असलें तर एक छोटेंसें नाटक करून बघा तुम्ही. आतां तुम्ही जेव्हां माहेरीं जाल तेव्हां डोळ्यांतून पाणी काढीत जा आणि 'मला नीट वागवीत नाहींत, मी पुन्हां सासरीं जाणार नाहीं' असें सांगा. मग वहिनी, तुमच्या स्वागतार्थ धांवत आलेले आई, वडील, भाऊ सगळे जागच्या जागीं थंड होतात कीं नाहीं बघा. आई पोटाशीं कवटाळून तुम्हांला तुमची चुकी समजावील. भाऊ एका डोळ्यांतून पाणी काढीत

दुसरा वटारून तुम्हांला परत सासरीं जायला सांगतील आणि वडील तुमच्या-वरील रागानें थरथर कांपत दुसऱ्या गाडीनें तुम्हांला सासरीं आणून घालव-ण्यासाठीं तयारी करूं लागतील.

पण लगेच तुम्ही हंसून मीं उगीच गंमत केली असें सांगितल्यावर सर्व मंडळी अशी भलतीच थट्टा केल्याबद्दल तुम्हांला कौतुकानें रागावल्यासारखें करतील आणि मग तुम्हांला तुमच्या " तिकडची " तार येईपर्यंत घरीं जाऊं देणार नाहींत.

वहिनी, तुम्ही म्हणाल कीं, आपल्या कुलीनपणाच्या व पातिव्रत्याच्या कल्पनांचा हा परिणाम आहे. पण कशाचा का परिणाम असेना, असें आहे ना ? मग बहिणींच्या प्रेमाची महति गाऊन काय होणार आहे ? रम्य कल्प-नांनीं कांहीं पोट भरत नाहीं किंवा भावांच्या प्रेमानें बहिणीचा सामाजिक दर्जाहि वाढत नाहीं.

प्रेमाच्या कल्पनांवर जग चालत असतें तर संसार म्हणजे काव्यच झालें असतें कीं. पण वाहिनी, कठोर सत्य असें आहे कीं जग पैशावर चालतें.

एका कुळांत जन्मलेले भाऊभाऊ पैशापायीं वैर करतात, पण म्हणून त्यांच्यांत प्रेमबंधनें रहावींत अशासाठीं मुलांना इस्टेट न मिळतां मुलींनाच तेवढी इस्टेट मिळावी व पुरुषांना बायकोकडून काय तो वांटा मिळावा असा कायदा केला तर तो सयुक्तिक होईल कां ? बहिणी बहिणी भांडल्या तरी त्या वेगळ्या कुळांतल्या असतात तेव्हां भांडेनात कां ? पण भाऊ एकोप्यानें वागले तर कुलाचा लौकिक वाढेल. पण असल्या कल्पनांपायीं पुरुषांचें आर्थिक स्वातंत्र्य नष्ट होईल. कोणी तरी या कायद्याला कबूल होईल काय ? मग निव्वळ काव्यकल्पनांच्या जोरावर बायकांना आर्थिक गुलामगिरींत ठेवण्यांत काय अर्थ आहे ? शिवाय कित्येक भाऊ वांटण्या करून घेऊन समंजसपणानें एकोप्यानें रहातात तसेंच बहिणीवरहि भावांचें प्रेम राहील. भावाचें बहिणीवर खरें प्रेम असेल तर तो पैशाकरितां अडून थोडाच बसेल ? उलट तो तिला कांहींएक आडकाठी न करतां वांटा उचलून देईल. भाऊ हुंडा

नाहीं कां देत ? पण हुंड्याचा उपयोग स्त्रीधनासारखा होत नसल्यामुळें तो स्त्रीच्या दृष्टीनें वांया जातो. म्हणून कायदेशीर वांटा स्त्रीला मिळाला पाहिजे. मुली प्रौढ होऊन आपापलीं लग्नें जमवूं लागल्या, कीं हुंड्याची बाब नाहींशी होईल. जग पैशावर हुरळलें असल्यामुळें मुलीच्या इस्टेटीच्या मानानें तिला स्थळ मिळेल. पण तिचें आर्थिक स्वातंत्र्य नष्ट होणार नाहीं.

वहिनी, तुम्हीं असा एक मुद्दा काढला आहे कीं, सासरच्या इस्टेटींतला हिस्सा मागणें योग्य, पण बापाच्या इस्टेटींतलाहि वांटा स्त्रियांनीं कां मागावा? मुलींना सारा जन्म सासरीं काढावयाचा असतो तेव्हां त्यांना तेथील इस्टेटींतच हक्क मिळावा हें योग्य. असें म्हणत बसल्यावर अविवाहित मुलींची काय वाट ? आर्थिक स्वातंत्र्याकरितां त्यांनीं लग्नबंधनांतच पडलें पाहिजे कीं काय ? कीं लग्न न झाल्याबद्दल शिक्षा म्हणून त्यांनीं चरितार्थासाठीं जन्मभर कुणाच्या तरी तोंडाकडे बघत बसावयाचें ? कारण बायकांनीं नोकऱ्या करणेंहि अर्थशास्त्राला संमत नाहीं. वडिलार्जित इस्टेटींत मुलांप्रमाणेंच मुलींनाही जन्मसिद्ध हक्क आहे. तुम्हीं म्हणतां कीं 'लग्न झालें कीं मुलीचें नांव, गोत, प्रेमाचें केंद्र हें सर्व बदलतें, मग माहेरच्या संपत्तीवर मुलीचा हक्क काय राहिला ?'

वहिनी, कबूल आहे तुमचें म्हणणें. सामाजिक सोयीकरितां मुलींचें नांव बदलतें, गोतहि बदलतें. पण वहिनी, रक्तसंबंध नाहींसा होतो का ? माहेरच्या संबंधांत विशेषपणा आहे तो हाच कीं, तो रक्तसंबंध आहे आणि सासरचा संबंध म्हणजे सामाजिक सोयीकरितां ओढून ताणून निर्माण केलेला असतो. मुलीवर सासूसासरे, दीर, नणंदा वगैरे कोणींहि प्रेम करीत नाहीं हें तुम्हीच कबूल करतां. राहतां राहिला काय तो पतिपुत्रांचा संबंध. पतिपत्नीसंबंध म्हणजे काय, कोळ्याच्या जाळ्यापेक्षांहि नाजूक तंतूंनीं बनवलेला. सांसारिक आपत्तींचे तडाखे त्याच्यावर सारखे बसत असतात. त्या आपत्तींतून स्त्रियांना तो जिवापाड जतन करावा लागतो. कारण स्त्रीची मान आर्थिक स्वातंत्र्याभावीं पुरुषांच्या हातीं दिलेली असते. अशा परिस्थितींत जर कां तें प्रेमबंधन तुटलें, तर पत्नीला समाजांत कांहींच मान्यता रहात नाहीं. सासरच्या संपत्तींत

मुलीला वांटा मिळाला तर पतीला त्यांत वैषम्य वाटेल. पतीजवळ स्त्रीचा दर्जा न वाढतां मनांत अढी घेण्याचा संभव उद्भवेल. पतीला असेंच वाटत रहाणार कीं, नैतिक दृष्ट्या हा पैसा माझाच आहे. आणि स्त्रीलाहि ही जाणीव रहाणारच. स्त्रियांना पोटगीचा हक्क असूनहि कितीशा स्त्रिया तो हक्क बजावतात? बरें, कांहीं स्त्रियांनीं अगतिक होऊन पोटगी मागितलीच तर ती कमींतकमी देण्याकरितां सासरचीं माणसे किती त्रास देतात! इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष पतीसुद्धां पोटगी द्यावी लागू नये म्हणून पत्नीला अनीतिमान् ठरवण्याची खटपट करतो. तसेंच आई मुलांवर प्रेम करते पण मुलें आईवर कुठें प्रेम करतात? नवऱ्यानें पैशाची सोय केली तर ठीक, नाहींतर मुलांच्या तंत्रानें तिला जिणें कंठावें लागतें. त्यांत सावत्र संबंध आल्यावर तर विचारावयासच नको.

पत्नी जोंपर्यंत पतीजवळ नांदते तोंपर्यंत त्यांचा संबंध. ती दूर गेली कीं तो संबंध तुटतो. मग कायद्याचा संबंध तेवढा उरतो. पण मुलगी किंवा बहीण सातासमुद्रांपलीकडे गेली आणि तिनें एक सोडून दहा नांवें बदललीं तरी त्यांचें नातें तुटेल का? त्यांचें रक्त बदलेल का? बहिणीला वांटा द्यावा लागूं नये म्हणून भाऊ बहिणीला अनीतिमान् ठरवील कां? म्हणजे पाण्यापेक्षांच काय, पण प्रेमापेक्षांहि रक्तच दाट असतें. कारण प्रेमाला कृत्रिम साधनें लागतात; रक्तसंबंध नैसर्गिक असतो.

पति पत्नीवर प्रेम करतो, तिला सुख देण्याकरितां तो सतत प्रयत्न करतो. पण कुठपर्यंत? ती त्याच्यावर प्रेमाचें जाळें घालते तोंपर्यंत. बरें, तिला जर समाजांत मानमान्यता व घरांतही सुस्थिति हवी असेल तर तिनें पतीला खूष ठेवलेंच पाहिजे. पत्नीची ही अगतिक स्थिति पति जाणूनच असतो. यामुळें पतिपत्नीप्रेमाला स्वामी आणि दासी संबंधाचें स्वरूप येतें. तुम्हांला नाहीं असें वाटत, वहिनी?

पण स्त्रीला नैसर्गिक हक्कानें मिळणारा पित्याच्या संपत्तींतील वांटा मिळाला म्हणजे तिला सामाजिकरीत्या स्वतंत्र दर्जा येईल. आपल्या कृपेवरच केवळ

पत्नीचा चरितार्थ व दर्जा अवलंबून नाहीं असें पतीला कळलें म्हणजे तो तिच्यावर अधिक शुद्ध स्वरूपाचें प्रेम करील. तिच्याविषयीं त्याला जास्त आदरभाव वाटेल.

भावांबहिणींचें प्रेम गोड असतें, काव्यमय असतें, कबूल आहे. पण संसाराच्या दृष्टीनें कोणत्या संबंधाला जास्त महत्त्व आहे? अर्थात् सासरच्या संबंधाला. कधींकधीं वर्षांवर्षांत भावांबहिणींची भेट होत नाहीं. स्त्रीला सासरीं पतीच्या सहवासांतच जन्म काढावयाचा असतो. तेव्हां मग वहिनी, अशा परिस्थितींत पैशामुळें प्रेमसंबंध बिनसतो असें गृहीत धरलें तर कोणता संबंध तुटला तरी चालेल सांगा बरें तुम्हीच.

कांहींतरी जुन्यापुराण्या कल्पनेमुळें आई माझ्याकडे येत नसेल ही नव्हती बाई मला कल्पना. पण वहिनी मुलांच्या बरोबरीनें मुलींनाहि वांटा मिळूं लागला म्हणजे असल्या पोकळ सबबी नाहींशा होतील नाहीं? मग आईला मुलीकडेहि रहाण्याचा हक्क येईल. मूल होईपर्यंत स्त्रीला पतीच्या घरांत मुळींसुद्धां सत्ता नसते, किंबहुना कुठेंच काडीमात्र सत्ता नसते. पतीच्या घरीं ती केवळ आश्रित असते, असेंच आईच्या असल्या कल्पनेचें सटीप भाषांतर होईल नाहीं हो वहिनी? आणि पुढें देखील मुलांच्या चांगुलपणावर आईचें सुख अवलंबून, मग बरी का ही स्थिति? मानसिक दृष्ट्या किती बरें हानिकारक आहे ही?

तुमचे आणखी बारीकसारीक मुद्दे म्हणजे स्थावर इस्टेटींत तुकडे पाडणें अयोग्य होय. पण मी म्हणतें कीं, वाटेल तितके भाऊ असले तरी जमिनीचे तुकडे पाडण्याला अर्थशास्त्र आड येत नाहीं मग स्त्रियांच्या बाबतींत मात्र असल्या सबबी कां पुढें आणाव्या? भावाभावांची शेती एकत्र नांदण्याचा जसा संभव आहे, त्यापेक्षांही भावांबहिणींची शेती एकत्र नांदण्याचा संभव जास्त आहे. कारण बहीण परगांवीं गेली कीं विश्वासानें भावालाच शेतीवाडीची व्यवस्था करावयास सांगेल. भावानें पैसे खाल्ले तरी तिला फारशी हळहळ

वाटणार नाहीं आणि ती गोष्ट ती चारचौघांत न सांगतां माहेरच्या अभिमानानें झांकून ठेवील.

सासरपेक्षां स्त्रियांचा ओढा माहेराकडे जास्त ही गोष्ट अगदीं सिद्ध आहे. संसारांत स्त्रीच्या हातीं सत्ता असली कीं ती माहेरचा गोतावळा जमवून यथाशक्ति मदत करीत असते हें आपण प्रत्यहीं पहातों. माहेरच्या घेण्याचा कांहीं संबंध नसतां जर मुली प्रेमाच्या ओढीनें मदत करतात मग वारसाहक्क मिळाल्यावर त्या वाइटापुरती पाठ फिरवतील असें वाटतें तरी कसें तुम्हांला, वहिनी ? वहिनी, लग्न झाल्यावर कायद्याच्या जुलमामुळें माहेर दुरावतें आणि सासर जवळ येतें. पण कायद्याची प्रेमावर सत्ता चालत नाहीं. माहेरचा जिव्हाळा लग्न झाल्यावर कांहीं नाहींसा होत नाहीं. मुलीच्या प्रेमाचें केंद्र लग्न झाल्यावर बदलतें असें म्हणण्यापेक्षां तिच्या प्रेमाचें क्षेत्र विस्तृत होतें असेंच म्हणणें अधिक सयुक्तिक ठरेल. प्रेमबंधन असूनही माहेर परकें वाटतें तें निवळ तेथें सत्ता रहात नाहीं म्हणून. ती सत्ता वारसाहक्कानें प्रस्थापित झाली कीं मुली दोन्ही कुळांची कीर्ति वाढवण्यास दुप्पट उत्साहानें प्रयत्न करतील. खरें ना पण ?

वहिनी, मला जें काय या बाबतींत वाटतें तें मीं स्पष्ट लिहिलें आहे. तुम्ही रागावणार नाहीं ही खात्री आहे. त्यांतून रागवायचें असलें तर खुशाल रागवा. तुमच्या रागाचें खापर माझ्या माथीं थोडेंच फुटणार आहे ! बरी दूर आहे तुमच्यापासून. त्यांतून फारच झालें तर चि. प्रसन्नाचे पापे घेऊन आपला राग शांत करा.

आई वगैरे वडील मंडळींना सा. न., लहानांस आ. कळावें, हे विनंति.

तुमच्या

वत्स.

---

## संसारचित्र : : ८

संसाराला चित्राची उपमा देतात, तें किती सार्थ आहे. जग हें एकाद्या प्रदर्शनाप्रमाणें असून प्रत्येक संसार म्हणजे एकेक चित्र आहे. चित्रकलाप्रदर्शनांतील चित्रें दर वर्षी नवीन येतात, कालांतरानें जुनीं चित्रें नष्ट होऊन जातात, जुनी चित्रपद्धति बदलून नवी पद्धति अमलांत येते. त्याचप्रमाणें कालाच्या ओघाबरोबर संसार बदलतात व संसारपद्धतीही बदलत जातात. कित्येक संसार पहावे तेव्हां एकादाच संसार सर्व बाजूंनीं रम्य दिसतो. आपण म्हणतों, 'वा. काय छान संसार आहे!'

पण हा उद्गार काढतांना तो संसार रम्य बनवणाऱ्या व्यक्तींना केवढे परिश्रम करावे लागले असतील याची आपल्याला कुठें कल्पना असते!

चित्रकाराला सुरेख चित्र काढण्याकरितां आधीं एक सुरेख चित्राची कल्पना मनांत रुजायला लागते; मग ती सर्व बाजूंनीं मनांत स्पष्ट उमटली म्हणजे मग चित्रांतील पात्रें अनुरूप अशीं शोधावीं लागतात. नंतर प्रसंगानुरूप पार्श्वभूमि, पात्रांचा अंगविक्षेप, मुखाविर्भाव, पोषाख, तसेंच रसानुकूल रंगमिश्रण आणि चित्र रेखाटण्यासाठीं उत्तम तऱ्हेचें साहित्य इतकें जमवल्यावर कुशलतेनें न कंटाळतां चित्रकार जेव्हां पराकाष्ठेचे श्रम घेतो, तेव्हां कित्येक दिवसांनीं एक सुंदर चित्र निर्माण होतें. पण त्याशिवाय आधीं चित्रकाराला कित्येक वर्षे पुष्कळसे पैसे खर्चून चित्रकला हस्तगत करावी लागते ती वेगळीच.

हीं झाली साध्या निर्जीव चित्राची गोष्ट. पण संसारचित्र आपलें आपणच काढावयाचें असतें. चित्र काढतां काढतां बिघडलें तर तें कॅनव्हस फेंकून देऊन दुसऱ्या कॅनव्हसवर तेंच चित्र काढतां येतें; पण संसारांत प्रथमपासूनच दक्षता बाळगावी लागते. कुठें थोडा दोष उत्पन्न झाला कीं तो कायमच रहातो.

रम्य संसार म्हणजे तो अमुक एक प्रकारचाच असला पाहिजे असें केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. राणीचा संसार वेगळा आणि मोलकरणीचा वेगळा. पण आपापल्यापरीनें दोन्ही संसारांना सारखेंच महत्त्व असतें. इतकेंच नव्हे, तर तज्ञ प्रेक्षकाला दोहोंमध्यें विसंगतपणा किंवा रम्यपणा सारख्याच प्रमाणांत शोधून काढतां येतो. शहरांतील उद्यानांतली शोभा लोकांना सतत दिसल्यामुळें त्याची स्तुति होते; पण रानावनांत अपरंपार शोभा असली तरी ती दृष्टीआड असल्यानें तिचें कौतुक होत नाहीं इतकेंच.

हे श्रेष्ठकनिष्ठ दोन्ही वर्ग समाजधारणेला आवश्यक असतात. परंतु या दोन टोकांना सांवरून धरणारा व समाजाला चैतन्य देणारा जो मध्यम वर्ग त्याविषयीं विचार करणें अधिक श्रेयस्कर होईल.

रम्य संसाराची अगदीं पहिली पायरी म्हणजे विचारपूर्वक केलेला विवाह. विचार आणि विकार यांमध्यें जरी दक्षिण व उत्तर ध्रुवांइतकें अंतर असलें, तरी विचारपूर्वक केलेलें लग्न आणि प्रेमपूर्वक केलेलें लग्न यांत मात्र सांगण्यासारखा फरक नाहीं. ‘गुणरसपान हेंचि सुख, प्रेम तया नांव जनीं’ ही प्रेमाची व्याख्या अत्यंत मार्मिक आहे. हें गुणरसपान विचारावांचून कोणाला करतां येईल हें मुळींच शक्य दिसत नाहीं. वधुवरांची आधीं बरीचशी ओळख, जाणेंयेणें असलें आणि नंतर त्यांनीं लग्न केलें, कीं त्याला आपण प्रीतिविवाह असें नांव देतों. परंतु अशा होणाऱ्या विवाहांत प्राबल्य विचारांचें कीं विकारांचें होतें—म्हणजे उभयतांना झालेलें परस्पराकर्षण शारीरिक होतें कीं मानसिक, यावरच त्यांच्या लग्नाला प्रीतिविवाह म्हणावें कीं नाहीं हें अजमावलें पाहिजे. ओळखीनंतर होणारा प्रत्येक विवाह जर प्रीतिविवाह असता, तर पुढें अशा कित्येक विवाहितांच्या संसाराचें वाळवंट झालेलें कसें दिसून आलें असतें?

कित्येक वेळां परस्पर गुणांच्या आकर्षणामुळें लग्न होऊन उभारलेले संसारसुद्धां अयशस्वी होतात; याचें कारण म्हणजे वधुवरांनीं फक्त गुणांपुरताच विचार केलेला असतो. वधुवरांना एकमेक म्हणजे सर्वगुणसंपन्नतेची मूर्ति असें

वाटणें हेंच प्रेमांधतेचें लक्षण नव्हे कां ? जगांत सर्वसद्गुणसंपन्न असा कुणीहि नाहीं, किंवा सर्वदुर्गणसंपन्न असाहि कोणी नाहीं. म्हणूनच वधुवरांनीं नुसत्या गुणांना महत्त्व देऊन भागत नाहीं. त्यांनीं परस्परांच्या अवगुणांचाहि विचार केलाच पाहिजे.

आयुष्यांत मोठ्यांत मोठी परीक्षेची वेळ म्हणजे वधुवरपरीक्षेची. वधुवर-परीक्षेला कुलशील, विद्या, वय, सौंदर्य व पैसा अशा सर्व गोष्टींचा विचार करणें अत्यावश्यक आहे. पण हल्लीं वरील अनुक्रम उलट दिशेनें अनुसरतात.

केवळ वर श्रीमंत आहे म्हणून किंवा वधूबरोबर खूप हुंडा मिळण्याचा संभव असतो म्हणून इतर दृष्टींनीं सर्वस्वी अहितकारक अशीं लग्नें हल्लीं कितीतरी होत आहेत. याचप्रमाणें केवळ शरीरसौंदर्याच्या जोरावरहि कितीक नको तीं लग्नें घडून येतात. संसारसुखाची स्थूल मानानें आंखणी करावयाची तर असें म्हणतां येईल, कीं निम्में सुख पतिपत्नींच्या एकोप्यामुळें निर्माण झालें तर निम्में सुख सुप्रजेमुळें निर्माण होतें. पतिपत्नींच्या एकोप्यावांचून सुप्रजा होणार नाहीं व अनुरूप वधुवर असल्याखेरीज पतिपत्नींचा एकोपा होणें दुष्कर.

वधुवर सर्वस्वीं अनुरूप असतांना केवळ पत्रिका जमत नाहीं किंवा हुंडा-करणी मनाजोगी मिळत नाहीं एवढ्या कारणाकरितां कितीतरी लग्नें मोडतात. हें त्या वधुवरांचें दुर्भाग्य तर खरेंच; पण त्यांच्या सुप्रजेला मुकल्यामुळें समा-जाचें केवढें अहित होतें त्याची जाणीव कुणाला असते काय ? मंगळाची मुलगी—मग ती कितीहि गुणी असो—तिला बिजवर तिजवर, वयस्क, मुलेंवाळे असलेला नवरा मिळायचा. मग तिचा संसार तो काय व्हायचा ? संसारांत तिला पतिसुख तें काय मिळणार किंवा तिला उत्तम संतति कशी लाभणार ?

राष्ट्राचा उत्कर्ष सुप्रजेमुळें होत असतो. विवाहसंस्था उत्कर्षाला पोंचली तरच सुप्रजा निर्माण होते. म्हणूनच विवाहसंबंधांत आत्यंतिक काळजी घेतली पाहिजे

लग्नाच्या वेळीं कुळ पहायचें तें हितकारक शरीरसंबंधाच्या दृष्टीनेंच. अमे-

रिकेंतील सुप्रजाजननशास्त्रज्ञांनीं कित्येक वंशावलींचा अभ्यास करून दाखवलें आहे, कीं कित्येक शारीरिक व मानसिक रोग पिढ्यानुपिढ्या एकाद्या कुळांत मूळ धरून असतात. एकाददुसरी पिढी त्या रोगांतून बचावली तरी तिसऱ्या चौथ्या पिढीवर त्या रोगाचा परिणाम झालेला दिसून येतो. यासाठीं वधू व वर या दोघांच्याहि कुळांत महारोग, क्षय, दमा वगैरे रोग किंवा अंधत्व, बहिरेपणा अशीं व्यंगें किंवा वेडेपणा, बेरडपणा असे मानासिक रोग असले, तर पुढल्या पिढींत हीं लक्षणें अतिशय बलवत्तर स्वरूपांत आढळून येतील. आपल्याकडे अजून महारोगी, वेडे, बेरड यांच्या लग्नांना बंदी झालेली नाहीं किंवा संततिप्रतिबंधहि करण्यांत आलेला नाहीं. तेव्हां शरीरसंबंध घडणाऱ्या दोन्हीं घराण्यांत एकाच प्रकारचा उणेपणा तरी असूं नये. इतकेंच नव्हे, तर तो उणेपणा झांकण्याजोगा कांहीं विशेष गुण प्रत्येक घराण्यांत असेल इतकी काळजी उभय पक्षांनीं जरूर बाळगावी.

वंशसंस्कारभेदावर पतिपत्नींचें सुखदुःख बरेंच अवलंबून असतें. दोन्हीं घराणीं समान दर्जाचीं आणि सारख्याच परिस्थितींत वाढलेलीं असलीं म्हणजे मतभेदाला तितकाच कमी अवसर सांपडतो. आपलें रोजचें आयुष्य कांहीं महत्वाच्या प्रसंगांनीं भरलेलें नसतें. साधेसुधे दैनिक व्यापार सुरळित पार पडले म्हणजे दिवस समाधानांत जातो. निदान दुसरीं कांहीं सांसारिक संकटें आलींच तर तीं निवारण्याला मन सावधान राहतें. बारीकसारीक गोष्टींनीं तें त्रासलें तर मोठ्या अडचणींत त्याची कशी अवस्था होईल हें काय सांगायला पाहिजे?

पण हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे, कीं अतिशय महत्त्वाचे वंशसंस्कार तेवढे विचारांत घ्यावे. उगीच बारीकसारीक गोष्टींचा कीस काढीत बसूं नये. यःकश्चित् गोष्टींना भलतेंच महत्त्व प्राप्त झाल्यामुळें जातिभेद बळावतात. असंख्य पोटजातीमुळें वधुवरांची निवड करण्याचें क्षेत्र आकुंचित होतें आणि फारशी चिकित्सा न करतां बऱ्याचशा गोष्टींकडे कानाडोळा करून शरीरसंबंध घडून येतात. शिवाय एकादी लहान जात असली म्हणजे त्या जातींत

इतकी परतवेल होते कीं गुणविकासाला वाव मिळत नाहीं आणि वंशदोष मात्र फैलावत जातात. नवलाची गोष्ट ही, कीं अशा रीतीनें कितीही रक्त-संकर झाला तरी चालतो पण हजारों वर्षांपूर्वी ज्या ऋषींनीं वंशविस्तार केला त्यांच्या रक्ताचा बिंदु जरी हल्लींच्या वंशजांत सांपडणें मुष्किलीचें असलें, तरी गोत्रप्रवरांची मात्र पूर्वीप्रमाणेंच जुळवाजुळवी करावी लागते. पूर्वींच्याच रीतीनें गोत्रप्रवर पहाण्यापेक्षां एकेका वंशाच्या सातसात पिढ्यांच्या इतिहासाचें परिशीलन करून गुणदोषदृष्टीनें कोणकोणत्या वंशांत शरीरसंबंध घडून आला तर सुप्रजाजनन होईल हें समाजहितकर्त्यांनीं निश्चित केल्यास फार उपयुक्त कामगिरी होईल. किंवा इतकी वाट पाहण्यापेक्षां सुशिक्षित वधुवरांनीं आप-आपला वंशविस्तार जरूर अभ्यासावा आणि लग्नसंबंध जमवितांना त्या माहितीचा योग्य तो उपयोग करून घ्यावा.

म्हणून मुलांमुलींना जें शिक्षण द्यावयाचें, तें अतिशय विचारपूर्वक ठरवलें पाहिजे. मनुष्याला मनुष्यत्व देण्याला एक शिक्षणच काय तें समर्थ आहे. शिक्षण दोन दृष्टींनीं उपयुक्त असतें. गुणांचा विकास करून दोष कमी करा-वयाचे हा मानसिक फायदा आणि चरितार्थ चालविण्याची पात्रता अंगीं येणें हा दुसरा फायदा. सध्यांचें शिक्षण कांहीं वर्षांपूर्वी स्तुतीला पात्र होतें; कारण मुळींच अक्षरशत्रु रहाण्यापेक्षां परभाषेंतून कां होईना, पण पैसेवाल्या लोकांना विद्या मिळवून तिच्या आधारावर पैसाहि कमावतां आला. पण आतां गरीब-श्रीमंत, धंदेवाले हेंच काय, पण मुलीहि एकसुरी पुस्तकी शिक्षण घेऊं लागल्या आहेत. आणि पैसा, शारीरिक आणि मानसिक बळ यांचा होम करून संसाराला नालायक बनत आहेत ही अतिशय हानिकारक गोष्ट आहे. सध्यांच्या शिक्षणपद्धतींत बदल हवा ही गोष्ट निर्विवाद आहे. पण फार विषय-चिकित्सा न करतां कसें शिक्षण असावें याला थोडक्यांत उत्तर द्यावयाचें तर असें सांगतां येईल, कीं स्वतःच्या मनोविकासाला समर्थ बनविणारें पुस्तकी शिक्षण आणि चरितार्थक्षम बनविणारें धंदेशिक्षण यांची योग्य तऱ्हेनें सांगड घालणारें शिक्षण पाहिजे.

मुलींच्या दृष्टीनें जरा वेगळी शब्दयोजना करावयाची तर मनोविकाससमर्थ बनविणारें आणि गृहिणीपद व मातृपद यथायोग्य तऱ्हेनें भूषवितां येईल असें शिक्षण त्यांना मिळालें पाहिजे.

कुटुंबसंस्था आदर्श बनवावयाची तर आदर्श गृहिणी तयार झाल्या पाहिजेत. आदर्श प्रजा पाहिजे तर आदर्श माता हव्यात. उत्कृष्ट प्रजेशिवाय राष्ट्राचा उत्कर्ष केव्हांहि होणार नाहीं. 'जिच्या हातीं पाळण्याची दोरी, ती जगाते उद्धारी' ही एक गोडशी कविकल्पना नसून तें एक त्रिकालाबाधित सत्य आहे. पण स्त्रीची इतकी थोरवी असताना, केवळ या गोष्टीमुळेच तिला शारीरिक दुर्बलत्व आलेलें असतांना आर्थिक पारतंत्र्यांत तिला ठेवून, तिच्या कार्याची हेटाळणी पुरुष करीत असतात. बायकांचें कर्तव्य काय? तर चूल अन् मूल. या दोन शब्दांनीं हल्लीं इतका तिरस्कार व्यक्त करण्यांत येतो, कीं स्वैंपाक करणें आणि मुलांचें संगोपन करणें यापेक्षां हलक्या दर्जाची अशी मुळीं कोणतीच गोष्ट जगाच्या व्यवहारांत जणुं सांपडणार नाहीं! यामुळें स्त्रियांना असें वाटूं लागतें, कीं असें आहे तर आम्ही तरी या गोष्टींसाठीं पुरुषांची गुलामगिरी कां पत्करावी? पत्नीत्व आणि मातृत्व या दोन गोष्टींना तिलांजलि दिली कीं पुरुषांच्या बरोबरीनें अर्थसंपादन करून पुरुषांना करतां येणाऱ्या प्रत्येक व्यवसायांत त्यांच्याशीं अहमहमिका करून, त्यांच्या बरोबरीचें स्थान मिळवितां येतें. मग आमच्याकडे अनादरानें पहाण्याची पुरुषांची काय प्राज्ञा आहे! आपलें स्त्रीत्व झुगारून देण्याची स्त्रियांना अनैसर्गिक लालसा उद्‌भवते त्याला जबाबदार पुरुषच.

या गोष्टी टाळण्याकरितां पुरुषांनीं स्त्रियांचें नैसर्गिक कर्तव्य किती श्रेष्ठ दर्जाचें आहे याची स्वतः जाणीव करून घेऊन स्त्रियांना आदरानें वागवायला शिकलें पाहिजे; तरच मुली योग्य शिक्षण घेतील आणि पुरुषांना उत्तम गृहिणी आणि मुलांसाठीं उत्तम माता मिळतील. यासाठीं त्यांना उपयुक्त असा शिक्षणक्रम बारा वर्षांत पूर्ण करतां येईल. म्हणजे अठरा वर्षें पूर्ण होतात तों मुली विद्यासंपन्न होऊन विवाहयोग्यहि बनतील.

अठरा वर्षांपर्यंत मुलींचा शरीरविकास पूर्ण झालेला असतो. अठरा वर्षांची मुलगी होण्यापूर्वी तिचें लग्न करणें म्हणजे तिला बळी देण्याप्रमाणें तर आहेच, पण शिवाय कुप्रजानिर्मितीला प्रोत्साहन देण्यासारखें आहे. मुलांनाहि उपयुक्त शिक्षणक्रम पुरा करण्यास बारा वर्षे पुरीं पडतील.

परंतु अठराव्या वर्षी मुलगी विवाहयोग्य होते; पण मुलगा मात्र होत नाहीं. निसर्गनियमाप्रमाणेंच मुलाला आणखी चारपांच वर्षें लागतात. म्हणूनच वधुवरांत पांच ते दहा वर्षांचें अंतर अवश्य असतें. यासाठीं अठराव्या वर्षी मुलाचा शिक्षणक्रम संपला तरी त्यानें चरितार्थाच्या धंद्याचा जम बसवण्यांत व संसार मांडण्यास उपयुक्त असा थोडाबहुत द्रव्यसंचय करण्यांत चारपांच वर्षे घालवावींत किंवा धंद्यांचें विशेष शिक्षण घ्यावें.

वधुवरांच्या वयांत दहाबारा वर्षांपेक्षां जास्त फरक असणें हें फार वाईट. वयोमानानें शरीर आणि मन यांत जे फेरबदल होत जातात, ते दोघांचे सारख्या प्रमाणांत झाले तर ठीक; नाहींतर बायको ऐन उमेदींत आणि नवरा उतार वयाचा ! म्हणजे मग त्या दोघांचें कसें जमायचें ?

वधुवरपरीक्षेच्या वेळीं आणखी एक खबरदारी घ्यावयाला हवी. दोघांचें नुसतें कुल बघून भागत नाहीं; तर दोघांपैकीं कोणाला स्वतःच्या दुष्कर्मांमुळें उद्‌भवलेला एकादा रोग आहे कीं काय, याची कसून चौकशी झाली पाहिजे. लग्न नक्की जमण्यापूर्वी आपला पूर्ण विश्वास असेल अशा डॉक्टराकडून दोघांची उभयपक्षीं जरूर परीक्षा व्हावी. साधा विमा उतरतांना तपासणी करून देण्यांत जर कुणाला कांहीं मानहानि वाटत नाहीं; तर दोघां पतिपत्नींच्या व त्यांच्या भावी संततीच्या सुखाचा विमा उतरण्यासाठीं शारिरिक तपासणी करूं देण्यांत कमीपणा वाटण्याचें काय कारण ? मानापमानाच्या मूर्ख कल्पना उराशीं बाळगून असल्या रोगांचें मूळ घरांत आणायचें म्हणजे आपल्या हातांनीं आपल्या कुळाचा नायनाट करण्यासारखें आहे. असल्या रोगांनीं जर्जर झालेली संतति देशाला देणें यासारखा घातकीपणा नाहीं. सुशिक्षितांनीं या प्रश्नाकडे जरूर लक्ष द्यावें.

एवढी एक परीक्षा केली कीं लग्नाच्या मार्गांतली एक आडकाठी दूर होईल खरी; परंतु समाजाच्या दृष्टीनें आणखीहि एक काळजी घ्यावयास हवी. ती म्हणजे असले रोगच होऊं नयेत म्हणून प्रयत्न करावयाचा. मुलगे आणि मुली वयांत येऊं लागल्यावर त्यांना नैसर्गिक परस्पराकर्षण होतें. लग्न व चांगली संतति याबद्दल आपल्यावर काय जबाबदारी आहे याची मुळींच जाणीव नसल्यामुळें व स्वेच्छाचाराचे परिणाम केव्हांकेव्हां किती घोर स्वरूपांत भोगावे लागतात याबद्दल कांहींच माहिती नसल्यामुळें दोघांकडून अविचार घडतो, किंवा या संकटांतून तीं बचावलीं तरी इंद्रियविषयक निश्चित माहिती नसल्यामुळें वाईट संवयींच्या आहारीं तीं जातात. यांतून मुलांमुलींचा बचाव करणें हें आईबापांचें तसेंच समाजाचेंहि कर्तव्य आहे. यासाठीं योग्य वेळीं मुलांमुलींस इंद्रियविषयक माहिती आणि पुढें त्यांच्यावर येणाऱ्या सांसारिक जबाबदारीची जाणीव अवश्य करून द्यावी.

जगाच्या व्यवहारांत पैशाला फार महत्त्व आहे. स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य नसल्यामुळें त्यांना तुच्छ लेखण्याची पुरुषांना संवयच पडून गेली आहे. ही भावना नष्ट होऊन तिच्या जागीं स्त्रीवर्गाबद्दल उदात्त भावना दृढमूल झाल्या पाहिजेत.

लग्नसमयीं वधुवरांचीं अंतःकरणें आनंदोत्फुल्ल झालेलीं असतात. टेकडी चढण्यापूर्वी तिच्यावरील घनदाट वृक्षराजि, तिच्यामधून नागमोडी सुंदर सोपी दिसणारी वाट, उगवणाऱ्या सूर्याच्या तांबूस प्रभेनें टेकडीमागें तयार केलेली मनोहर पार्श्वभूमि व बालकिरणांनीं झाडांच्या हिरव्या रंगावर चढवलेली चमक आणि अगदीं टेकडीच्या माथ्यावर दिसणारें लहानसें विश्रांतिस्थल या गोष्टी बघून प्रवाशांचें मन हुरळून जातें. काव्य सुचतें तें याच वेळीं. आपल्या जोडीदाराबरोबर गप्पागोष्टी करीत आपण मजेंत वर पोंचूं असें त्यांना वाटतें. वाटेंतील खांचखळगे, कांटेरी झुडुपें, उत्तरोत्तर डोक्यावर येणाऱ्या सूर्याचें ऊन आणि पावलागणिक दमविणारी वाट हीं प्रत्यक्ष चढणीच्या वेळीं अनुभवास येतात. दोघांच्या कसोटीची वेळ हीच असते. अशा वेळीं जोडीदार

हातपाय गाळून पिरपिर करीत रडत बसेल तर काय उपयोग ? तोच जर संकटांना न जुमानतां आपल्यालाहि धीर देऊन चालला तर दोघें सुखासमाधानांत वर चढून जातील आणि वाटेंतील निसर्गरम्य स्थळांचा मनसोक्त उपभोग घेतील.

संसाराचा मार्गहि असाच सुखदुःखांनीं भरलेला आहे. लग्नाच्या वेळीं संसारांतील रम्यपणा तेवढा दिसतो. प्रेमच्छटेमुळें भविष्यकाळ गोड व उज्ज्वल भासतो. पण संसाराला सुरवात केल्यावर जेव्हां दुःखांमागून दुःखें येऊं लागतात तेव्हां मन गडबडून जातें. अशा वेळीं जोडीदार चांगला असेल तर ठीक; नाहींतर संसार म्हणजे जिवावर भार आणि शेवटीं असार वाटायचा !

म्हणूनच मागें जें सांगितलें, कीं वधुवरांनीं परस्परांच्या केवळ गुणांवरच भाळून उपयोग नाहीं, त्यांनीं एकमेकांच्या अवगुणांचाही विचार केला पाहिजे तें येवढ्याचसाठीं. संकटांच्या वेळीं मनुष्याचे दुर्गुण उघड होतात. तसेंच पतिपत्नींच्या स्वभावांतील कांहीं कांहीं दोष सहवासामुळें कळत जातात. प्रेमांधतेचा काळ लवकरच संपतो आणि मग एकमेकांचे दोष दिसले कीं प्रेमाला ओहोटी लागूं लागते. लग्नानंतर उघडकीला आलेल्या एकाद्या दुर्गुणामुळें दुसऱ्याच्या मनांत तिटकारा उत्पन्न होऊन दोघांच्याहि संसाराचें रान होतें.

आतां कोणी असें म्हणतील, कीं प्रत्येक व्यक्तींत गुणाप्रमाणें दोषांचाहि भरणा असायचाच. मग त्या दोषांचा आधीं विचार करून फायदा काय ? जे दोष असतील त्यांकडे पतिपत्नींनीं कानाडोळा करावा व तेवढ्यापुरतें अंतःकरण उदार ठेवावें. पण विचार करावयाचा अशासाठीं, कीं आपल्या सहचरांतील दोष आपल्या सहनशक्तीच्या मर्यादेंत आहेत कीं नाहींत ? प्रत्येकाची सौंदर्यविषयक आवडनावड जशी वेगळ्या प्रकारची, त्याप्रमाणें गुणावगुणांचेंही असतें. वधुवरांनीं आधीं चिकित्सक बुद्धीनें स्वतःचे गुणदोष, आवडनावड यांची माहिती करून घेऊन आपल्या जन्माचा सहचर निवडावा. आपल्या

गुणांचेंच तेवढें प्रदर्शन करून दोष झांकून ठेवल्यामुळें दुसऱ्याची फसवणूक तर होतेच, पण खरोखरी ही मनोवृत्ति आत्मघातकीपणाचीच ठरते.

वधुवरांनीं लोकांच्या मतांना प्रमाण मानून लग्न करून घेणें चुकीचें आहे. कारण स्वभावविशेषाप्रमाणें आवड भिन्न असते आणि ती दुसऱ्याला कळणें शक्य नसतें.

एखादा सुंदर पुरुष कुरूप पत्नीवर प्रेम करतांना पाहून आश्चर्य वाटतें. पण त्या पुरुषाचा स्वभावविशेष विचारांत घेतल्यावर तें आश्चर्य नाहींसें होतें.

पतीला स्वतःच्या सौंदर्याबद्दल फार अभिमान असला तर कुरूप पत्नीकडून त्या अभिमानाचें पोषण होत असतें. अशा पुरुषाला त्याच्या स्वरूपाचें गर्वहरण करणारी पत्नी मिळाली तरच तो तिच्यावर कितपत प्रेम करील याबद्दल शंका वाटते. म्हणजे अशा पुरुषाच्या बाबतींत कुरूपता हा दोष न ठरतां गुणच ठरतो.

त्याचप्रमाणें एकादा विद्वान् पति आपल्या अशिक्षित पत्नीला बरोबरीनें मिरवतांना पाहूनही नवल वाटण्याचें कारण नाहीं. पत्नीचा अशिक्षितपणा हा त्या पुरुषाला सह्य अवगुण वाटत असला पाहिजे.

किंवा पुष्कळ वेळां एकादा दोष रुचत नसूनहि इतर गुणांच्या जोरावर तो सहन करावयास मनाची तयारी होते.

पण कित्येक वेळां परिस्थितीपुढें मान वांकवून नको ते दोष पत्करावे लागतात. अति चिकित्सा करून वधुवरांनीं परस्परांच्या गुणदोषांची खानेसुमारी सुरू केली, तर कित्येक वेळां लग्न जमण्याचीच पंचाईत पडते. म्हणून डोळे उघडे ठेवून परीक्षा करावी येवढा मुद्दा महत्त्वाचा मानून वागलें तरी पुरे.

लग्न झाल्यावर, संसाराची जडजोखीम वाहूं लागल्यावर पतिपत्नींना एकमेकांच्या खऱ्याखुऱ्या स्वभावाची ओळख पटते. पूर्वी केव्हांहि दृष्टीस न पडलेले गुणदोष दिसून येतील किंवा पुष्कळ वेळां आलेल्या परिस्थितीच्या धक्क्यामुळें एकादा अगदीं नवीनच गुण किंवा दोष उत्पन्न झालेला आढळून येईल. अशा वेळीं त्या गुणाचें कौतुक करून त्याला प्रोत्साहन देणें किंवा दोषांबद्दल

सहनशीलता व सहानुभूति दाखवून तो दूर करण्याचा प्रयत्न करणें, इतकें औदार्य पतिपत्नींनीं आपल्या ठिकाणीं नसलें तर आणलें पाहिजे. दोघे परिस्थितिसाम्यानें बांधलीं गेलेलीं असतात व त्यांचें हितानहित सारखेंच असतें, आणि प्रेमबंधनामुळें त्यांचीं मनेंहि मिळालेलीं असतात; पण तीं कितीहि एकजीव झालेलीं असलीं तरी गंगायमुनेच्या पाण्याप्रमाणें त्यांचें स्वभावभिन्नत्व कायमच रहातें. तेव्हां मतभेदाच्या प्रसंगीं उभयतांना हितैक्यबुद्धीनें नीट विचार करून आणि वेळप्रसंगीं दोघांनांही नमतें घेऊन प्रसंग निभावून नेला पाहिजे.

प्रत्येक वेळेला स्त्रीलाच नमवायचें यांत यत्किंचित्‌सुद्धां पुरुषार्थ नाहीं. वळी तो कान पिळी हें रानटी तत्त्वच त्यांत आहे. वधू ही लग्नानंतर जुनीं प्रेमबंधनें तोडून सासरीं नव्या नात्यांत येऊन पडते. तें घर वेगळें, त्यांतील व्यवस्था वेगळी, त्या माणसांचे रितिरिवाज व वागण्याबोलण्याची पद्धत निराळी. हिला त्यांच्याबद्दल आपलेपणा वाटत नाहीं. बोलूनचालून सर्व कृत्रिम नातें जोडलेलें. वर मात्र आपल्या मायेच्या माणसांत लहानपणापासून वाढलेल्या परिस्थितींत असतो. त्याचे सर्व व्यवहार आत्मविश्वासानें चाललेले असतात. पण त्याची पत्नी मात्र बुजल्या-बावरल्यासारखी झालेली असते. दासीप्रमाणें पतीची सेवा करून त्याची मर्जी संभाळली तर ठीक. मग त्या आधारावर इतर मंडळींत तिला जरा वागतां येते. तिच्या नवऱ्याची गैरमर्जी झाली कीं इतर मंडळीं तिला नीट वागवीत नाहींत आणि तिला ‘ नको हा जीव ’ असें होऊन जातें. पुढें कांहीं वर्षांनीं ‘ चार दिवस सासूचे, चार दिवस सुनेचे ’ या न्यायानें इतर मंडळींत तिला मानाचें स्थान मिळालें तरी पतिपत्नीमधील सेव्यसेवकभाव मात्र शेवटपर्यंत कायम रहातो.

पण नववधूची कुचंबणा टाळण्यासाठीं एकत्र कुटुंबपद्धतीवर एकजिनसी हल्ला चढवावा असें मला कांहीं वाटत नाहीं. सास्वासुनांची आणि जावाजावांच्या दुष्टाव्याचीं वर्णनें ऐकलीं आणि प्रत्येकाच्या मनाला होणारा जांच पाहिला, म्हणजे अशा रीतीनें एकत्र राहण्यापेक्षां विभक्त राहणें बरें असें वाटतें

खरें; पण त्या एकत्र कुटुंबपद्धतींत दोषांइतकेच गुणहि आहेत. विभक्त कुटुंबांत पगारी नोकरांवर फार विसंबावें लागतें. एकट्या पुरुषावर अर्थसंपादन आणि इतर बाहेरच्या व्यावहारिक भानगडी यांची जबाबदारी, तर स्त्रीवर गृहव्यवस्था, मुलेंबाळें यांची जबाबदारी पडते. एकत्र कुटुंबांत सर्व प्रकारची जबाबदारी वांटली जाते. शिवाय भाडोत्री माणसांवर हरघडी अवलंबून रहावें लागत नाहीं. सासूसुनेचें किंवा नणंदाभावजयांचें कितीहि भांडण असो, आपलें लहान मूल सासूजवळ किंवा नणंदेजवळ ठेवून जातांना जसें निर्धास्त वाटेल, तसें नोकराजवळ ठेवतांना कधींच वाटणार नाहीं. आजारीपणांत, बाळंतपणांत नवऱ्याच्या जेवणाचे हाल होतील कीं काय किंवा मुलांकडे कोण पाहील ही चिंता पडत नाहीं. जुलमाचा रामराम म्हणून लाजेकाजेनें किंवा आपल्यालाही अडीअडचणींत त्यांचा उपयोग होईल या भावनेनें म्हणा, आजाऱ्याचेंहि व्यवस्थित होतें आणि मुलाबाळांचीहि आबाळ होत नाहीं. खरोखर समजुतदारपणानें जर मंडळी एकत्र कुटुंबांत राहिली तर पैशाच्या दृष्टीनेंहि मदत होते आणि सत्तेचें मनुष्यबळ जवळ मिळतें. पण दुष्टाव्यामुळें सुखाचा घांस तोंडांत पडण्याची मारामार झाली तर कधींहि एकत्र कुटुंबांत राहूं नये. स्वतंत्र संसार थाटण्याजोगी नोकरीधंद्याची सोय असल्याखेरीज पुरुषानें लग्न करूं नये. आपल्या पत्नीचा एकत्र कुटुंबांत कोंडमारा होईल असें वाटलें तर कुणाचीहि भीड न ठेवतां विभक्त राहानें.

विभक्त कुटुंबांत पतिपत्नींना परस्परांवरच आधारावें लागून त्यांच्या प्रेमाला अवसर सांपडतो. चहाड्याचुगल्या करायला कोणी नसतें आणि परस्परांच्या आवडीनिवडी पुरविण्याइतकी स्वतंत्रताहि असते.

पति ज्याप्रमाणें श्रम करून पैसा मिळवतो, त्याप्रमाणें पत्नी अविश्रांत घरांत खपून गृहव्यवस्था ठेवीत असते. नोकर असले तरी काम कमी होतें, पण जबाबदारी थोडीच नाहींशी होते! मुलांबाळांचें काम तर कधीं संपतच नाहीं. पण गंमत ही, कीं पुरुषांना कामाबद्दल लगेच पैशाच्या रूपानें मोबदला मिळत असल्यामुळें त्यांच्या कामाला अवास्तव किंमत चढते आणि स्त्रियांचें काम

घरांतल्या घरांत असतें, दिवसभर राबलें तरी सांगतां येत नाहीं; त्याला कसला मोबदलाहि मिळत नाहीं म्हणून तें विनामूल्य समजलें जातें.

काय म्हणे, तर पति दमूनभागून घरीं आला कीं पत्नीनें हास्यमुखानें त्याचें स्वागत करावें, गोडगोड बोलून त्याचें मन रिझवून श्रमपरिहार करावा, त्याचे कपडे उतरून व्यवस्थित ठेवावे आणि चहाफराळाची जय्यत तयारी ठेवावी ! अन् पतीनें काय करावें ? त्यानें चिडचिड करावी ? पत्नी स्वतः घरकाम करून दमलेली नसते वाटतें ? पतीचा श्रमपरिहार तिनें करावा हें जसें तिचें कर्तव्य, त्याप्रमाणें पत्नीचा श्रमपरिहार करणें हें पतीचेंहि कर्तव्य समजलें पाहिजे. पत्नीनें पतीच्या कामाबद्दल गौरव करावा हें जसें रास्त, त्याप्रमाणें पतीनें पत्नीचें कौतुक करणें आवश्यक आहे. पुरुषांचें काम असें असतें, कीं वरिष्ठ किंवा आजूबाजूचे लोक यांना तें दिसून त्याचा त्यांच्याकडून गौरव होतोच. नोकरी-धंद्यांत चांगल्या कामाचा मोबदला लगेच जास्त पैसा मिळण्यांत होतो. पण स्त्रीच्या कामाचें कौतुक पतीनें केलें नाहीं तर दुसरें कोण करणार ? कौतुका-शिवाय तिच्या कामाला मोबदला तरी कुठें आहे ? तिला पैशाचा मोबदला नकोच असतो. स्त्रीच्या मनाची घडण अशी असते, कीं प्रेमासाठीं ती जीव लावून काम करते.

'किती काम केलंस आज ?' इतके शब्द पतीच्या तोंडून ऐकले तरी तिला पुरतें. पण हें दूरच राहून पुरुष बायकांना हिणवीत असतात, कीं 'तुमचा जन्म मोठा सुखाचा. घरांतल्या घरांत बसून झोंपा काढायच्या, चकाट्या पिटायच्या, आणि संध्याकाळीं नवनवीं लुगडीं नेसून, दागिने घालून मिरवायचें.' आतां हें थट्टेचें बोलणें असतें हें कबूल आहे; पण पुष्कळांची स्त्रियांच्या जीवनाबद्दल थोडीफार अशीच समजूत असते.

यामुळेंच, स्त्रियांना आपल्यापेक्षांहि अधिक बाह्य करमणुकींची आवश्यकता असते याची जाणीव पुरुषांना होत नाहीं. आपण मित्रमंडळींच्याबरोबर नाटकें-सिनेमा पहावयाचे, सहली काढावयाच्या किंवा तासन् तास पत्ते खेळत बसावयाचें. बायकोला कधींमधीं नाटक किंवा एकादा मराठी बोलपट दाख-

कला कीं झाली इतिकर्तव्यता. बरें, बायकोनें आपल्या मैत्रिणींबरोबर करमणूक करून घ्यावी तर त्यांना स्वतंत्रता नसते. वरच्या घरीं काय करतां येईल तेवढेंच करायची त्यांना मोकळीक.

पत्नीचें तारुण्य नेहमीं टिकून रहावें असें जर प्रत्येक पतीला वाटत असेल, तर तिच्या करमणुकीसाठीं पतीनें ऐपतीप्रमाणें तयार असलें पाहिजे. नाहींतर घरांतील एकसुरी कामकाजामुळें तिचें पूर्वीचें उल्हसित मन उदासीन होऊन ती पोक्त बनली तर त्याचा दोष कोणाकडे ?

आपण घरीं जाण्याची वेळ झाली कीं पत्नीनें नीट वेणीफणी करून, चांगलेसें लुगडें नेसून बसावें आणि आपणापाशीं आनंदानें हंसावें बोलावें असें पतीला वाटतें. तिनें गबाळेपणा दाखवला कीं स्वारी रागावलीच ! पण रसिकपणाच्या भावना पतीलाच तेवढया असतात आणि पत्नीला नसतात असें कां आहे ? बाहेर जातांना अगदीं सूट, नेकटाय–कॉलर घालून शृंगार करावयाचा आणि घरीं आल्यावर पंचा किंवा अंगाच्या घाटाला शोभत नसली तरी पोकळ विजार किंवा चड्डी घालायची, अंगांत कांहींच घालायचें नाहीं किंवा अर्ध्या बाह्यांचा सदरा घालायचा ! त्यामुळें छातीवरलें व पुढल्या हातावरलें केंसांचें किळसवाणें दृश्य दिसत असतें. डोक्ीचे केंस विस्कटलेले, घामाधुळीनें मळलेला चेहेरा आणि सिगारेटच्या वासानें युक्त असें तोंड, या सर्व गोष्टींचा बायकांना कंटाळा वाटत नाहीं अशी कां पुरुषांची समजूत आहे ?

पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांनाहि भावना आहेत–नव्हे, पुरुषांपेक्षां स्त्रियांचें मन हळुवार असतें; त्यांच्या भावना अधिक कोमल असतात, त्यांची रसिकता फार नाजूक स्वरूपाची असते, यासाठीं पुरुषांनीं फार जपलें पाहिजे.

स्त्रीच्या ठिकाणीं पराकाष्ठेची सहनशीलता असते; पण केवळ त्या एका गुणाच्या आधारावर तिला एकेक दिवस कंठायला लागणें हें तिचें दुर्दैव आणि पतीचेहि दुर्दैवच नव्हे तर काय ? एकदां भावना दुखावल्या, मन मेलें, म्हणजे त्याची ती पत्नी कसली ? चालतीबोलती बाहुलीच ती.

स्त्रीची मोठ्यांतली मोठी हौस भागवायची म्हणजे तिला पुष्कळ लुगडीं घेऊन द्यावयाचीं आणि दागिने करावयाचे. यापलीकडे तिला जणुं कांहीं महत्त्वाकांक्षाच नसते ! निरनिराळ्या कला शिकाव्या, नवे खेळ खेळावे, एकादी नवी भाषा शिकावी, किंवा कांहीं सामाजिक उपयुक्त असें कार्य करावें असें पत्नीला वाटत असतां कित्येक वेळां पति तिचा हिरमोड करतो. 'आतां काय करायचं तुला हें करून ?' असें म्हटलें कीं संपलें !

पण पुष्कळ वेळां बायकादेखील दोषाला पात्र असतात. पति रसिकपणानें नवनव्या गोष्टी शिकवायला किंवा करमणुकींत तिला भागीदार करायला तयार असला तरी फाजील लाजेमुळें किंवा 'वेळ कुठं होतो ?' या सबबीवर किंवा केवळ हट्टवादीपणामुळें त्या पतीची इच्छा पुरवीत नाहींत.

मुलें झाल्यावर तर कांहीं विचारायलाच नको ! मुलें म्हणजे त्यांना सर्वस्व वाटूं लागतें आणि नवऱ्याची त्यांना जणुं विस्मृतीच होते. मातृपद लाभलें तरी पत्नीपदाची जबाबदारी कमी होत नाहीं. मुलें झालीं कीं पोक्तपणानेंच वागलें पाहिजे असें मुळींच नाहीं. मातेनें आपलें अनुभविक शहाणपण मुलांना शिकवीत असावें व त्यांचा आनंदी अल्लडपणा आपण शिकावा.

पुरुषांच्या रसिक वृत्तीला पत्नीकडून प्रत्युत्तर मिळालें नाहीं, मुलें झाल्यावर पत्नीचें पतीकडे दुर्लक्ष होऊं लागलें, म्हणजेच पतीची नजर घराबाहेर वळते. पतीचें प्रेम उडाल्यावर मग रडत बसण्यापेक्षां आधींच जपलेलें काय वाईट !

पतिपत्नींचें आणखीहि कांहीं बाबतींत चुकत असतें. दोघांमधील प्रेम-बंधनाला संशयाची काळी लागली, कीं तें तुटण्याला मुळींच वेळ लागत नाहीं. पतिपत्नींनीं परस्परांच्या आवडीनिवडीबद्दल आदर बाळगणें जसें अत्यावश्यक, त्याप्रमाणें परस्परांविषयीं दृढ श्रद्धा आणि विश्वास ठेवणें हें दोघांच्याहि मनःस्वास्थ्याला जरूरीचें असतें. येवढयातेवढ्या गोष्टीवरून संशय धरून स्वतःचें मन पोखरल्यासारखें करावयाचें आणि मग मनाची खात्री करून घेण्यासाठीं पतीनें पत्नीवर किंवा पत्नीनें पतीवर टेहेळणी करावयाची, नोकरांना एकमेकांच्या पाळतीवर ठेवायचें किंवा एकमेकांना खोदून खोदून

कुचकेनासके प्रश्न विचारायचे आणि रागवारागवी, चिडाचीड झाली कीं मित्रमंडळीजवळ रडूनकढून गृहच्छिद्रें सांगत सुटायचें आणि निंदा करायची यासारखी अजाणपणाची आणि आत्मघातकीपणाची दुसरी गोष्ट नाहीं.

पतिपत्नींचा संसार म्हणजे कुलुपबंद कपाटांतील मौल्यवान् दागिन्यांसारखा आहे. दोघांखेरीज तिसऱ्या कुणाच्या हातीं किल्ली जाऊन कपाटांत त्यानें ढवळाढवळ करतां उपयोगी नाहीं. कपाटाला बिलोरी आरसे लावले तरी त्यांची पाठ आंतल्या जिनसांकडे. मग पतिपत्नी आंतल्या ठेवींची जी किंमत सांगतील, ती लोकांना मान्य करावी लागते. बाजारी जगाला दागिने दाखवले कीं त्यांची किंमत उतरलीच. पतीनें लग्नाच्या वेळीं बांधलेलें मंगळसूत्र पत्नीला प्राणाहून मोलाचें वाटलें तरी इतरांना त्याची किंमत फक्त एक रुपया! तसाच पतिपत्नींचा संसार म्हणजे त्यांचें सुखसर्वस्व त्यांत गुंतलेलें. इतरांच्या दृष्टीनें समाजाचा एक घटक इतकेंच त्याचें महत्त्व. कितीहि जिवलग मित्र-मैत्रिणी असूं देत, त्यांचें हितानहित ज्याअर्थी यांच्या संसारावर अवलंबून नसतें, त्याअर्थी त्यांना आपल्या संसारांत ढवळाढवळ करूं देणें हें अनुचित आहे. संसार करण्यास नालायक असल्याचें तें लक्षण आहे.

पतिपत्नींना जितक्या मित्रमैत्रिणी अधिक तितकी त्यांना करमणूक अधिक हें खरें. पतिपत्नींना सामाजिक आयुष्य जरूरच असतें. एकमेकांत गुरफटून त्यांचें आयुष्य कंटाळवाणें होईल. आनंदाच्या प्रसंगीं आनंद द्विगुणित करायला मित्रमंडळी उपयोगी पडतात, त्याप्रमाणें अडीअडचणीला सुहृद साहाय्य करतात. मित्रांच्या दुःखानंदांत आपण समभागी होणें, त्यांना मदत करणें यांतहि एक प्रकारचें सुख लाभतें. शिवाय तें एक सामाजिक कर्तव्यच आहे. मित्रमैत्रिणी याकरतां असाव्या. पतिपत्नींनीं परस्परांविरुद्ध उखाळ्या पाखाळ्या करण्याकरतां नकोत. आपला संसार आपल्याला सांवरतां आला नाहीं तर मित्रमैत्रिणी कांहींही मदत करूं शकणार नाहींत.

पतिपत्नींचा परस्परांवर विश्वास असला, कीं त्यांना मुळीं कुणाची गरज लागणारच नाहीं. प्रेमाचें सामर्थ्य येवढें प्रचंड असतें, कीं त्याच्या जोरावर

संसारांत कितीहि अडचणी आल्या तरी त्यांतून निभावून जाण्याला पतिपत्नींना धैर्य येतें.

पुढील संसाराच्या दृष्टीनें लग्नानंतरचीं दोनतीन वर्षे फार महत्त्वाचीं असतात असें म्हटलें तर चुकीचें ठरणार नाहीं. पतिपत्नीमधील प्रेमबंधन दृढ होऊन परस्परांबद्दल विश्वास उत्पन्न होतो तो याच वेळीं. या दोनतीन वर्षांत प्रेमसुखाचा त्यांनीं भरपूर उपभोग घ्यावा हें योग्यच होय. यासाठीं या काळांत त्यांना संतति होऊं नये. नंतरहि होणारी संतति परिस्थितिमानाप्रमाण मित आणि प्रत्येक मुलाचें संगोपन यथायोग्य काळजी घेऊन करतां येईल इतक्या अंतरानें व्हावी. या गोष्टी नशिबावर न सोंपवितां अत्यावश्यक म्हणून पतिपत्नींनीं विचारपूर्वक ठरवाव्या. मुलें म्हणजे खायला काळ आणि धरणीला भार असें वाटतां कामा नये. वर्षा दोन वर्षांचा पाळणा लग्न झाल्यापासून तों म्हातारपणापर्यंत आपला चालूच आहे, बहुतेक मुलें अकालींच मृत्युमुखीं पडत आहेत, जिवंत असलेलीं मुलें आजारामुळें आईचें आयुष्य आणि बापाचा पैसा हरण करीत आहेत आणि मग या पोरांचें होणार कसें, म्हणून आईबाप काळजीनें ग्रस्त होऊन आयुष्य कंठीत आहेत, अशा परिस्थितींत संसारसुख कसें लाभणार ?

वीस ते पस्तीस वर्षांपर्यंत स्त्रिया प्रजानिर्मितीला उत्तम रीतीनें समर्थ असतात. या काळांत चारपांच वर्षांच्या अंतरानें मुलें झालीं तर तीं सर्व दृष्टींनीं सुदृढ होतात आणि आईलाहि मुलांची नीट प्रेमानें जोपासना करून शिवाय आपली शक्ति व तारुण्य परत मिळविण्यास अवसर सांपडतो. मातृपद आणि पत्नीपद दोन्ही तिला यथायोग्य रीतीनें संभाळतां येतात.

पतिपत्नींचें एकनिष्ठ प्रेम व विश्वास, दुसऱ्याचें सुख तेंच आपलें सुख ही परस्परांची जाणीव, आनंदाचें निधानच अशी मित, सुदृढ, सद्‌गुणी संतति आणि समाजांत संसाराचा योग्य तो गौरव! सुंदर चित्राप्रमाणें कुशलतेनें रेखाटलेला संसार तो हाच नव्हे काय ?

झाडांची चित्रविचित्र ऊनसांवली पडलेली असून दोन सौंगडी हंसत-खिदळत खेळत असतां फोटो घेतला कीं तें दृश्य मनोहर दिसतें.

सुखदुःखांच्या ऊनसांवलींत पतिपत्नी एकदिलानें आनंदांत संसार करीत असतांना दुरून पहाणारा काय म्हणतो ? ‘ अहाहा ! काय गोड संसारचित्र हें ! ’

---

## इंग्लंडमधील स्त्रिया : : १

(हा लेख “ उद्यम ” मध्यें जानेवारी १९३८ मध्यें अपूर्ण छापून आला. त्यापुढील भाग पुढल्या अंकांत छापण्याचें जमलें नाहीं आणि हस्तलिखित माझ्याकडे परतही आलें नाहीं. तेव्हां कांहीं भाग या संग्रहांत गाळला आहे. ज्या स्त्रियांनीं महनीय कामगिरी केली त्यांपैकीं कांहींसंबंधीं नांवनिशीवार थोडया चरित्रासह माहिती दिली होती. ती आतां देणें अशक्य आहे. परंतु लेख अपूर्ण राहूं नये म्हणून स्त्रियांच्या कार्यक्षेत्राचा विस्तार त्रोटकपणें सांगितला आहे. )

पाश्चात्त्य देशांमध्यें आज औद्योगिक क्षेत्रांत स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें प्रत्येक बाबतींत चढाओढीला उभ्या असून यशस्वी होत आहेत, असें दिसून येत आहे. वास्तविक पुरुषांनीं आत्मसात् केलेल्या प्रचंड औद्योगिक क्षेत्रांत वांटणी मिळविण्यासाठीं पाश्चात्य स्त्रियांना खरोखरी तपश्चर्या—निःशस्त्र युद्ध—करावी लागलेली आहे.

एक शतकाच्या या युद्धांत खरोखरी पुढाकार घेऊन, चळवळी करून, जनतेकडून शिव्याशाप पत्करून जर कोणी अतिशय धडाडी दाखवली असेल तर ती इंग्लिश स्त्रियांनींच ! युरोप, अमेरिका येथील स्त्रिया इंग्लिश स्त्रियांच्या पाठीमागें असत. आज अमेरिका, रशियामध्यें इंग्लंडच्या बरोबरीनें स्त्रिया

औद्योगिक क्षेत्रांत नमकत आहेत; तर उलट जर्मनी, इटली येथील स्त्रिया पुन्हां गृहक्षेत्रांतच परत जात आहेत.

इंग्लंडमधील स्त्रियांना अजूनही कांहीं बाबतींत पुरुषांच्या बरोबरीनें कार्य करून दाखवावयाचें आहे. परंतु त्यासंबंधीं लिहिण्यापूर्वीं प्रथमत: स्त्रियांची महत्त्वाकांक्षा किती संकुचित स्वरूपाची होती हें पहाणें अप्रस्तुत होणार नाहीं.

गेल्या शतकाच्या प्रथमार्धांतच काय पण नंतरही पाव शतकापर्यंत स्त्रियांचें मुख्य ध्येय विवाह हें असून गृह हेंच औद्योगिक क्षेत्र होतें. पूर्वीं हिंदु स्त्रियांना ज्याप्रमाणें वेदशास्त्रें शिकण्यास प्रतिबंध होता त्याचप्रमाणें इंग्लंड-मध्येंही स्त्रियांना शास्त्रांचें वावडें होतें. बौद्धिक क्षेत्रांत स्त्रियांनीं शिरणें म्हणजे स्त्रीजातीला लांछनास्पद समजण्यांत येई. स्त्रीपुरुषांचीं कार्यक्षेत्रें अगदीं भिन्न मानण्यांत येत. स्त्रियांना साधें शिक्षणसुद्धां धड मिळत नसे.

श्रीमंत सुखवस्तु स्त्रियांचें कर्तव्य म्हणजे मुलांना सांभाळणाऱ्या दाईपासून तों तहत सर्व नोकरांवर योग्य ती देखरेख करणें व घर सुव्यवस्थित ठेवणें; मुलांना नीट वळण लावणें; जेवणसमारंभ नीट पार पाडणें; आपल्या मैत्रिणींना अल्पाहारासाठीं बोलावणें आणि त्यांच्याबरोबर, शिवणकाम, गृहव्यवस्था, वेषभूषा इ० विषयांवर गप्पा मारणें किंवा पत्ते खेळणें वगैरे. इतके केले कीं झाली आदर्श गृहिणी! शिवाय लोकोपयोगी संस्थांना किंवा गरिबांना देणग्या, दानधर्म, केला कीं ही 'आदर्श नागरिक' सर्वत्र मानसन्मानाला पात्र होत असे.

मध्यवर्गीय स्त्रीला पैशाच्या टंचाईमुळें स्वतःच घरांतील काबाडकष्टाचीं कामें करावीं लागत. शिवाय मुलांचं संगोपन. याशिवाय यथाशक्ति गांवांतील गरीबगुरिबांना अन्नवस्त्राची मदत करणें किंवा अनुभवजन्य ज्ञानाच्या जोरावर आजाऱ्यांची सेवाशुश्रूषा, सुईणपणा करणें. बस्स! ही झाली मध्यमवर्गीय आदर्श स्त्री!

या घालून दिलेल्या मर्यादेचें एखादीनें उल्लंघन केलें कीं समाजानें गहजब केलाच. स्त्रीला पिता, पति व मुलगा यांच्या आधारावर जीवन कंठावें

लागत असल्यामुळें या नातलगांच्या अभावीं ती आणखी दूरच्या नातलगांजवळ राहून काबाडकष्टद्वारें स्वतःच्या अन्नवस्त्राची सोय करी. पण चरितार्थासाठीं नोकरीधंदा करावा लागणें म्हणजे अगदीं कमीपणाची पराकाष्ठा मानली जाई.

बौद्धिक क्षेत्रांतही स्त्रियांची फार कुचंबणा होई. शिक्षणाची सोय तर नाहींच पण त्याला मान्यताही नाहीं.परंतु कोंदणाशिवाय किंवा पैलूशिवायही हिरा जसा चमकल्यावांचून रहात नाहीं, त्याचप्रमाणें स्त्रियांमधून हाताच्या बोटांवर मोजतां येतील एवढ्या का होईना पण कांहीं कादंबरीकार तर कांहीं कवयित्री चमकून गेल्या. जेन ऑस्टिन, जॉर्ज इलियट, शार्लट ब्रॉंटे वगैरे कादंबरीकार स्त्रियांचीं पुस्तकें अजून लोकप्रिय आहेत. गेल्या शतकांत कांहीं चांगल्या कवयित्री होऊन गेल्या, पण त्यांचीं काव्यें हल्लीं फारशी वाचनांत नाहींत. अशी एक आख्यायिका आहे कीं एका सुप्रसिद्ध मुत्सद्याला आपली मुलगी कविता लिहिते हें आढळून येतांच त्यानें तिला पुन्हां कविता न रचण्याबद्दल विनंति केली. वास्तविक मुलीनें लिहिलेल्या कविता त्याला अत्यंत आवडल्या होत्या. पण मुलगी सुशिक्षित आहे असा गवगवा समाजांत होऊन तिलाच त्रास होईल अशी त्याला भीति वाटली !

मेरी समरव्हिल या ज्योतिःशास्त्रांत पारंगत असलेल्या स्त्रीला लॅटिन भाषेंतील " प्रिन्सिपिया " वाचावयाचें होतें. यासाठीं तिनें भीतभीत एका प्रोफेसरांना असा सल्ला विचारला कीं, लॅटिन शिकल्यास स्त्रीसौजन्याला बाध येईल काय ? यावर त्या प्रोफेसरांनीं सांगितलें कीं, तें पुस्तक वाचण्यासाठींच जर लॅटिन शिकावयाचें असेल तर मोठेसें कांहीं बिघडणार नाहीं.

पुढें १८३५ सालीं मेरी समरव्हिल आणि कॅरोलिन हर्शेल या दोघींना इंग्लंडमधील ज्योतिःशास्त्रमंडळांत सभासद म्हणून निवडण्यांत आलें. या स्त्रिया ज्योतिःशास्त्रांत पारंगत होत्या व त्यांनीं बहुमोल कामगिरीही केलेली होती. तरीही या नेमणुकीबद्दल जनतेनें कुरकूर केलीच. मेरी समरव्हिल हिनें ज्योतिःशास्त्रावर एक ग्रंथही लिहिलेला आहे.

पुढें १८४८ सालीं क्वीनस् कॉलेज उघडण्यांत येऊन स्त्रीशिक्षणाची थोडीबहुत सोय झाली. लोकनिंदेचे प्रहार सहन करीत करीत स्त्रीशिक्षणाचा प्रसार होऊं लागला. हळूहळू लोकमत या बाबतींत उदार होऊं लागलें. शिक्षणांत सुधारणा होऊन आणखीहि शिक्षणसंस्था सुरू झाल्या. शिक्षणांत फेरबदल होत होत धंदेशिक्षणही देण्यांत येऊं लागलें. स्त्रिया पुरुषी क्षेत्रांत शिरून उद्योगधंदे करूं लागल्या तर त्यांच्या कर्तव्याची हेळसांड होऊन आमच्या पोटावर पाय येईल अशी ओरड पुरुषांनीं चालविली होतीच.

यानंतर वीस वर्षांनीं एका मुलीनें लंडन युनिव्हर्सिटीच्या प्रवेशपरीक्षेला बसण्याची परवानगी मागितली पण ती नाकारण्यांत आली. यामुळें स्त्रियांमध्यें अधिकच जागृति होऊन केंब्रिज युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमाच्या तोडीला तोड देणारें विद्यालय उघडण्यांत आलें.

स्त्रीला गृहक्षेत्रांतून काढता पाय घेण्याला पुष्कळच सबळ कारणें होतीं. यंत्रें नव्हतीं, त्यावेळीं स्त्रियांना घरगुती कामें करण्यास अतिशय कष्ट पडत. त्यामुळें त्यांना भरपूर काम मिळून पुरुषांना त्या भारभूत वाटत नसत. स्त्रियांच्या कष्टाखेरीज कुटुंब चालणें अशक्य होतें. पण यांत्रिक युग सुरू झाल्या-वर घरांत होणाऱ्या जिनसा आयत्या विकत मिळूं लागल्या, त्यासाठीं पैशाची जरूर पडून जीवन महाग झालें. घरांतही सुधारणा होऊन स्त्रियांना घरगुती काम फारसें राहिलेंच नाहीं. अविवाहित मुली किंवा कोणत्याही कारणानें पराव-लंबी जीवन कंठणाऱ्या स्त्रिया नातलगांनाच काय पण बापालासुद्धां पोसणें जड वाटूं लागलें. निरुद्योगी व परावलंबी जीवनामुळें स्त्रियांच्या मनांत हळूहळू असमाधान उद्भवूं लागलें व त्या असमाधानाच्या अंधारांतूनच सहस्रकराप्रमाणें, शेंकडों उद्योगधंद्यात शिरून पुरूषांच्या बरोबरीनें आर्थिक स्वातंत्र्य मिळवि-ण्याची महत्त्वाकांक्षा उद्भवली. पण स्त्रिया उद्योगधंदे करीत तेसुद्धां मर्यादित असत. सुईणपणा, परिचर्या, मोलमजुरी अशीं कामें त्या सुरवातीला करीत.

पूर्वीं पोटासाठीं स्त्रीनें उद्योगधंदा करावा ही गोष्ट कमीपणाची समजण्यांत येई पण हळूहळू ती भावना बदलून परावलंबी किंवा निरुद्योगी जीवन कंठणें

हेंच कमी प्रतीचें असें समजण्यांत यावयाला लागलें. विवाहित, सुखवस्तु स्त्रियासुद्धां आळसांत काळ न घालवतां कांहीं समाजकार्य किंवा धंदा करावयाला लागल्या. राणी व अमीर उमरावांच्या स्त्रिया यथाशक्ति जनसेवेंत आपला वेळ घालवूं लागल्या. रॅमसे मॅक्डोनाल्डच्या मुलीनें तर खाणावळ चालवली आहे ! पोस्टखातें, बॅंक, हॉटेल या ठिकाणीं १८७५ सालापासूनच कारकून, सॉर्टर या जागीं कांहीं स्त्रिया नमण्यांत आल्या होत्या. पण त्या गोष्टी आक्षिप्त समजण्यांत येत.

उद्योगधंद्यांचें क्षेत्र खरोखरीं समानतेच्या तत्त्वावर स्त्रियांना लाभून त्यांना आपली कर्तबगारी दाखविण्याची सुवर्णसंधि लाभली ती १९१४–१८ सालच्या महायुद्धाच्या वेळीं.

महायुद्ध सुरू झालें आणि स्त्रियांचें युद्ध समाप्त झालें. पार्लमेंटांत मताधिकार मिळावा म्हणून इंग्लिश स्त्रियांनीं दंगेधोपे देखील केले होते. अमेरिकेंतील कांहीं प्रांतांत व नॉर्वेमध्यें स्त्रियांना मताधिकार मिळाला तरी इंग्लंड व इतर युरोपियन राष्ट्रें मात्र मताधिकाराच्या विरुद्ध होतीं. इंग्लंडमधील मताधिकाराची चळवळ करणाऱ्या स्त्रियांना सफ्रेजिस्ट म्हणत. यांपैकीं पुढारी म्हणून नांवाजलेल्या स्त्रिया म्हणजे मिसेस पॅंखर्स्ट, व्हायकौंटेस स्नोडन वगैरे.

इंग्लिश स्त्रिया इतक्या चिडलेल्या होत्या तरी इंग्लंडनें महायुद्धांत भाग घेतांच, सर्वजणी एकजुटीनें पडेल ती राष्ट्रसेवा करण्यास तयार झाल्या. आम्हांला होईल तितकी देशसेवा करूं द्या, ही त्यांची मागणी झाली. तरुणांना रणक्षेत्रावर जाण्याची मोकळीक मिळावी याकरितां ते करीत असलेले उद्योगधंदे स्त्रियांना करूं द्या अशी स्त्रियांनीं मागणी केली. पण ती प्रथम नाकारण्यांत आली. तरीही इंग्लंडमध्यें गांवोगांवीं स्थापन झालेल्या महिलामंडळांनीं वेतन मिळो वा न मिळो होईल त्या प्रकारें देशसेवा करण्याचा उपक्रम चालू केला. लंडनमधील महिलामंडळानें अडचणीच्या प्रसंगीं लंडनमधील ऑमनिबस कंपनीला शंभर स्त्रिया कंडक्टर म्हणून दिल्या. युद्धमंडळानें नंतर आपण होऊन कित्येक वेळां स्त्रियांची मदत मागितली व

स्त्रियांनीं ती दिली. याप्रमाणें स्वैंपाकघरांतील अन्नांत बचत करण्यापासून तों विमानाचे कांहीं भाग तयार करण्यापर्यंत स्त्रियांचा उपयोग झाला.

यापेक्षांही अत्युत्कृष्ट कामगिरी स्त्रियांनीं करून दाखविली. डॉ. एल्सी इंग्लिस या अलौकिक बुद्धिमान् स्त्रीनें फ्रान्स व सर्बिया येथें इस्पितळें उघडून लढाईंत जखमी झालेल्या लोकांची शुश्रूषा करण्याची उत्तम सोय केली. त्या इस्पितळांत डॉक्टर, सर्जन, परिचारिका, ऑर्डर्ली, मोटारड्रायव्हर्स अशीं सर्व बहुविध कामें स्त्रियाच करीत. या इस्पितळांना लागणारा खर्च स्त्रियांनीं स्वतःच वर्गणी गोळा करून जमविलेला होता. डॉ. इंग्लिस या विदुषी स्त्रीप्रमाणेंच डॉ. फ्लोरा मरे व डॉ. लुईसा अँडरसन यांची कर्तबगारी दिसून आली. या दोघी डॉक्टरांच्या युद्धसमयींच्या कामगिरीचा गौरव करून त्यांना पुढें लंडनमध्यें एका लष्करी इस्पितळावर मुख्य म्हणून नेमण्यांत आलें. डॉ. लॅंबर्ट हिलाही किताब देण्यांत आला आहे. तिला जे. पी. नेमण्यांत आलें असून ती आरोग्यमंत्रिमंडळाची मेडिकल ऑफिसर आहे. शिवाय अनेक लोकोपयोगी संस्थांची ती मेंबर आहे.

मिसेस स्टोबार्ट या स्त्रीचीही त्यावेळची कामगिरी अत्यंत प्रशंसनीय झाली. बाल्कन युद्धांत हिनेंच स्त्रियांचें एक पथक तयार करून जखमी लोकांची शुश्रूषा केली. त्याबद्दल बल्गेरियन रेडक्रॉसनें तिचा सन्मानही केला होता. याच महिलेनें १९१४–१८ या महायुद्धाच्या काळांत बेल्जम आणि फ्रान्स या देशांत इस्पितळें उघडून त्यांची उत्कृष्ट व्यवस्था ठेवली. अँटवर्प येथील इस्पितळांची व्यवस्थापक असतांना त्या गांवाची जाळपोळ झाली, तेव्हां मिसेस स्टोबार्ट हिला जर्मनांनीं पकडलें व हेर म्हणून तिला ठार करण्याचा हुकूमही सुटला होता ! त्यानंतरही आणखी कांहीं इस्पितळें उघडून तिनें देशसेवा चालूच ठेवली. १९१५ मध्यें तिला सैन्यासाठीं काढलेल्या इस्पितळावर मुख्य म्हणून नेमण्यांत आलें. ही जागा मेजरच्या बरोबरीची अशी अतिशय बहुमानाची होती. तिच्या अप्रतिम कामगिरीबद्दल अनेक देशांनीं अनेक प्रकारे तिचा बहुमान केला. लढाईनंतरही मिसेस स्टोबार्ट हिनें आपली देशसेवा सोडली नाहीं.

एस्. ओ. एस्. सोसायटीच्या उत्पादकांपैकीं ती एक असून त्या संस्थेची, ती दुय्यम अध्यक्ष आहे. तसेंच स्पिरिच्युअल कम्युनिटीची अध्यक्ष व पुढाकार घेणारी असून, धार्मिक बाबतींत सुधारणा करण्यासाठींही एक संस्था स्थापून ती चालवीत असते. "वॉर अँड वुमन" व अशीं बरींच पुस्तकें व लेख मिसेस स्टोबार्ट हिनें लिहिलेले आहेत. शिवाय या स्त्रीनें टेनिसमध्यें सतत तीन वर्षे कॉर्निश चँपिअनशिप कप मिळवला.

या तिघी चौघी स्त्रीडॉक्टरांशिवाय आणखीही कित्येक स्त्रीडॉक्टरांनीं व कर्तबगार स्त्रियांनीं युद्धसमयीं इस्पितळांत उत्तम कार्य करून दाखविलें. फ्रान्स व सर्बिया या देशांनीं कृतज्ञ बुद्धीनें या स्त्रियांचा चांगला मानसन्मान केला. त्याच-प्रमाणें इंग्लंडमध्यें पुरुषांच्या अभावीं शेती व इतर धंदे बुडूं लागले तेव्हां हजारों स्त्रियांनीं पुरुषांच्या जागीं कामें करून, धंदे जगवून धान्य व माल पुरविला. याप्रमाणें मताधिकारासाठीं पुरुषांशीं भांडून जी गोष्ट स्त्रियांना साधली नाहीं, ती त्यांनीं युद्धाच्या वेळीं अनेक प्रकारच्या हालअपेष्टा सोसून जी देशसेवा केली त्यामुळें त्यांना साध्य झाली. स्त्रिया म्हणजे अबला, त्यांचें शहाणपण चुलीपुरतें आणि त्यांचा पराक्रम प्रजोत्पत्ती करून मुलांची जोपासना करण्या-पुरता. त्यांनीं आपलें क्षेत्र सोडूं नये, सोडलें तरी त्यांना पुरुषी उद्योग-धंदे साधणार नाहींत ही जी पुरुषांची दृढ भावना होती ती आतां पार बदलून गेली.

इंग्लिश स्त्रियांची ही फलाशाविरहित केलेली देशसेवेची तपश्चर्या स्त्रियांच्या पुढील उन्नतीला कारण झाली. १९१८ सालीं पार्लमेंटनें स्त्रियांना मताधिकार दिला व १९१९ सालीं लेडी ॲस्टर हिला प्रचंड बहुमतानें पार्लमेंटमध्यें स्त्रीप्रतिनिधि म्हणून निवडण्यांत आलें.

याचवेळीं राष्ट्रसंघानेंही ठराव केला कीं, या संस्थेंत पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रियांनाही नेमून घ्यावें मग काम कोणतेंहि असो. रेचल इ. क्राउडी या महिलेनें युद्धसमयीं पुष्कळ राष्ट्रसेवा केलेली होती. फ्रान्समधील शुश्रूषा-पथकांची ती मुख्य अधिकारी होती. १९१९ ते १९३१ पर्यंत हिनें राष्ट्र-

संघासाठीं काम केलें. शस्त्रास्त्रपरिषदेसाठीं पाठविलेल्या कमिशनवर ही एकच स्त्रीसभासद होती. तिच्या कार्याच्या गौरवार्थ तिला डेम हा किताब देण्यांत आलेला आहे.

इंग्लंडमध्यें स्त्रियांना ज्यूरींत घेण्याचा व मॅजिस्ट्रेट म्हणून नेमण्याचाही कायदा झाला. आतां कित्येक स्त्रिया जे. पी. आहेत. त्याचप्रमाणें मोठमोठ्या विद्यापीठांत शिक्षणाधिकाऱ्यांची इच्छा असल्यास स्त्रियांना सभासद म्हणून नेमण्यास हरकत नाहीं असें ठरविण्यांत आलें आहे. स्त्रियांना म्युनिसिपालिटींतच काय पण प्रत्येक परगण्याच्या व्यवस्थापकसंस्थांतही मताधिकार मिळाला. कांहीं परगण्यांत स्त्रियांना मेयर म्हणून देखील निवडण्यात येतें. सध्यां मँचेस्टर येथें मिसेस जोसेफ टूल म्हणून मेयर नेमण्यांत आलेली आहे. विशेष म्हणजे ती पूर्वीं गिरणींत सूतकाम करीत असे. मिसेस जे. मॅकमॉर्डी ही बेलफास्ट परगण्यांत कांहीं वर्षे आल्डरमॅन होती. तिलाच १९२८ मध्यें बेलफास्टची शेरीफ नेमण्यांत आलें. ती १९२१ ते १९२५ पार्लमेंटची मेंबर असून सध्यां जे. पी. आहे. तिला एल्‌एल्. डी. ही पदवी व सी. बी.ई. हा बहुमानाचा किताब मिळालेला आहे.

आतां स्त्रियांना कोणत्याही विद्यालयांत पुरुषांच्या बरोबरीनें शिक्षण घेतां येतें. जगावरील कोणतीही भाषा शिकण्यास त्यांना प्रतिबंध होत नाहीं; मुळीं विद्यापीठांनींच विदुषी स्त्रियांना प्रोफेसर, लेक्चरर म्हणून नेमलेलें आहे.

कांहीं विषयांत स्त्रियांची प्रगति होणें अशक्य असें पुरुषांनाच काय पण स्त्रियांना देखील वाटत असे. पण तें वाटणें अनुभवांतीं निर्मूल ठरलें आहे. इतिहास, भूगोल, ॲग्रिकल्चर, अर्थशास्त्र, राज्यव्यवस्थाशास्त्र, जातिशास्त्र, उत्खननशास्त्र, संख्याशास्त्र, प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, वैद्यकीय आणि न्यायशास्त्र, अशा दुर्बोध्य शास्त्रांत शेंकडों स्त्रिया पारंगत होऊन, उत्तम विद्यालयांत त्या त्या विषयांच्या अध्यापिका म्हणून कामें करीत असून कांहींनीं पुस्तकेंही लिहिलेलीं आहेत, आणि कांहीं पुढील शास्त्रीय संशोधनासाठीं पुरुषांच्या बरोबरीनें अखंड परिश्रम घेत आहेत.

ज्या कलांमध्यें पूर्वी फक्त हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्याच स्त्रियांचा प्रवेश झालेला होता त्यांत आतां हजारों स्त्रिया मौल्यवान कामगिरी करीत आहेत.

एमी मॉलिसन या धाडसी वैमानिक स्त्रीची आजकाल सर्व जगाला माहिती आहे. तिनें आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, अमेरिका अशा खंडांमध्यें विमानद्वारां प्रवास करून पुरुषवैमानिकांचा गतीचा विक्रमांक अनेक वेळां मोडला. कित्येक स्त्रिया आतां पायलट होऊन विमानांची नेआण करीत असतात.

कांहीं इंग्लिश स्त्रियांनीं मोठ्या धडाडीनें व्यापार करून मोठमोठाले कारखानेसुद्धां चालविले आहेत.

रेलवे, पोलीसखातें यांतसुद्धां आतां स्त्रियांना महत्त्वाच्या कामावर नेमतात.

याप्रमाणें पुरुषांच्या बहुतेक सर्व औद्योगिक क्षेत्रांत स्त्रियांनीं पदक्षेप केला आहे.

बहुतेक सर्व म्हणण्याचें कारण म्हणजे स्त्रियांना युद्धविषयक जबाबदारीच्या नेमणुका अद्याप मिळालेल्या नाहींत.

सन १९१८ मध्यें महायुद्ध संपलें, त्यावेळपासून इंग्लिश स्त्रियांनीं हें ध्येय डोळ्यांसमोर ठेवलेलें होतें. त्या म्हणून दाखवीत कीं, पुन्हां जर इंग्लंड युद्धांत पडलें तर आम्ही फक्त परिचर्येचेंच काम करून समाधान मानणार नाहीं. तर आम्हीही पुरुषांच्या बरोबरीनें सैन्य आणि आरमार यांत कामें करून उत्कृष्ठ प्रकारें राष्ट्रसेवा करूं.

आतां पुन्हां युरोपांत युद्ध सुरू झालें आहे. इंग्लिश स्त्रियांची युद्धविषयक महत्त्वाकांक्षा पूर्ण होते कीं नाहीं हें अजून जगाला दिसावयाचें आहे!

---

# समाजांतले कारागीर : : १०

संध्याकाळीं सहज हवा खाण्यासाठीं गच्चीवर मी स्वस्थ बसलें होतें. पण मन मात्र कांहीं स्वस्थ नव्हतें. दिवसभरांत ऐकलेल्या केलेल्या गोष्टींच्या अनुरोधानें एकापाठोपाठ एक असे विचारतरंग उद्भवत होते. सकाळीं मी एका आदर्श समाजसेविकेला कांहीं कामानिमित्त भेटून आलें होतें. नंतर दुपारीं एका खटल्याची हकिगत मला कळली होती. वाटमारीचा खटला होता तो. कां कोण जाणें त्या दोन्हींची मी तुलना चालवली होती. श्वान आणि युवक यांना एका वाक्यांत बांधून घालण्याप्रमाणेंच होता जरासा माझा प्रयत्न. किंवा दूध आणि वीष यांच्या तुलनेप्रमाणेंच होता म्हणाना.

सकाळीं मी भेटीला गेलें होतें त्या बाई. त्यांचा कर्तासंवरता थोरला मुलगा आपली पत्नी आणि मुलेंबाळें यांना व आपल्या वृद्ध आईला सोडून कालवश झाला होता. त्या बाईवर चार वर्षांपूर्वीच पतिनिधनाची आपत्ति कोसळली होती. उभयतां पतिपत्नींच्या चाळीस वर्षांच्या अखंड आणि सुखद सहवासानंतर मृत्यूनें त्यांची बेदरकारपणें ताटातूट केली होती.

मी त्यांच्या समाचाराला म्हणून गेलें तेव्हां माझे पाय घरांत शिरतांना लटलट कांपूं लागले होते. पण किती शांतपणानें आणि धैर्यानें त्या वृद्ध स्त्रीनें तीं दुःखें सहन केलीं ! पतिनिधनानंतर एक वर्ष त्या बाईनीं असह्य दुःखावेगानें तळमळून काढलें. नंतर त्यांनीं समाजसेवेंत मन गुंतवलें.

आणि त्यांचें मन जरा कुठे स्थीरस्थावर होतें तोंच त्यांच्यावर पुत्रनिधनाची वीज कोसळली होती. त्यांचें त्यावेळचें दुःख बघून मला वाटलें यांना आतां वेड लागणार. पण नाहीं. चार महिन्यांत मोठ्या निग्रहानें मन आंवरून त्यांनीं आपलें समाजसेवेचें व्रत पुन्हां हातीं घेतलें. आजला त्या एक आदर्श समाजसेविका झाल्या आहेत. पती असतां त्या जरा स्वार्थपरायण होत्या, पण मागून त्यांची ती स्वार्थदृष्टि पुष्कळच निवळली. हल्लीं तर कांहीं कांहीं वेळीं समाजसेवेंत त्या पदराला थोडा खारही लावून घेतात.

या विचारलहरीवर मन पोहत असतांच, मधूनच एका वायुलहरीवर चंदनाचा मंदमधुर परिमल तरंगत आला. आकंठ पान करावें त्याप्रमाणें मी त्याचें अवघ्राण केलें आणि एक प्रकारच्या शांत, सोज्वल सुखभावनेनें मन भरून गेलें. खरोखर या चंदनाचा जन्म किती निस्वार्थ! स्वतः जळून लोकांना आनंद द्यायचा. फुलेंसुद्धां अशींच. आपल्या सौंदर्यानें, नाजुकपणानें, सुवासानें तर तीं सर्वांना संतोषवितातच; आणि शिवाय त्यांना चुरगळलें तरी तीं अधिकच सुगंध देतात. हो. आणि कांहीं लोकदेखील असेच असतात.

The good are better made by ill
as odours crushed are sweeter still.

आघात सोसून त्या बाईनींही देवकळा अंगीं आणली.

हे आघात जर त्यांच्यावर पडले नसते तर--

तर एका परीनें बाईटच झालें असतें. नव्हे कां?

मनुष्यांनीं अधिकाधिक उच्च दर्जाला पोंचून आपल्याजवळ यावें म्हणून देव सर्वांवर संकटें आणतो. संकटकालीं धैर्यानें सन्मार्गावर पुढें जाणें हीच मनुष्याची परीक्षा पास झाल्याची खूण. मनुष्यानें पास व्हावें हीच देवाची उत्कट इच्छा.

"देवा, कित्ती कित्ती तूं चांगला आहेस रे." असें मी कृतज्ञतेनें आकाशाकडे पहात म्हटलें आणि गद्गदपणें एक दीर्घ श्वास घेतला. आणि–

शीः कसलीशी घाण येऊन मला अगदीं उमदळून आलें. मी दोन बोटांनीं नाक गच्च आंवळून धरलें आणि तोंड वेडेंवाकडें करीत म्हटलें, "ज्या वाऱ्याबरोबर सुगंध येतो त्याच वाऱ्यावर ही घाण येते. कशाला येते ही? ही अस्तित्वांत तरी कशाला येते?"

सकाळचा तो आरोपी. दुष्ट चांडाळ. परधनाचा अपहार करणारा. पण हकिगत किती हृदयदायक! आरोपीचीं चार कच्चीबच्चीं नी बायको होती. बायको बाळंत असून आजारी होती. नोकरी नाहीं, खायला अन्न नाहीं, औषधाला पैसा नाहीं, कीं कुणाची मदत नाहीं. बायकोची तरफड, पोरांची

अन्नान्नदशा बघवेना म्हणून आरोपीनें कोयता हातीं घेऊन, एका ओसाड रस्त्यावर पाळत ठेऊन एकस्या जाणाऱ्या एका वाटसरूकडून पांच रुपये घेतले. तितक्यांत मदत येऊन आरोपीला पकडण्यांत आलें. त्याला कांहीं महिने सक्तमजुरीची शिक्षा मिळाली तेव्हां तो ढळढळां रडत न्यायाधिशांना म्हणाला, "साहेब, माझ्या जागीं आपण असतां तर काय केलं असतं?"

आपत्तींत त्याचें धैर्य टिकलें नाहीं. आपत्तीचे घांव सोसून तो देवत्व पावला नाहीं. तो नीच दशेला गेला. पण त्यानें न्यायाधिशाला विचारल्या-प्रमाणें दुसरा कुणी त्या जागीं असता तर त्यानं काय केलं असतं? नोकरी-हमालीकरतां तो आरोपी गांवभर हिंडत होताच. भीकसुद्धां मागितली त्यानं. पण सहा माणसांचं पोट त्यामुळें कसं भरणार? त्या आरोपीच्या जागीं कुणी धैर्यवान् मनुष्य असता तर त्यानं वाटमारी केली नसती. कबूल. पण त्यामुळें त्याला देवानं लगेच तारलं असतं कां?

कुणी देवदूतानं उपाशी पोरांबाळांच्या तोंडांत व्हिशिवॉटर घातलें असतें कीं अंगमर्दन करून अंगांत तेल जिरवलें असतें कीं उपास करण्याबद्दल त्यांचा गौरव केला असता? देवानं डॉक्टराच्या रूपानं येऊन गुन्हेगाराच्या बाळंत बायकोला फुकट औषधपाणी करून आजारांतून उठवली असती? नसती ना?

मग आरोपीपुढें फक्त दोन मार्ग होते. नीतीनं राहून बायकापोरं तडफडून मरतांना डोळ्यानं बघायचं आणि शेवटीं आपणही मरायचं.

दुसरा मार्ग अनीतीचा. तोच त्याला सोपा वाटला. खरं पाहलं तर तेवढा एकच मार्ग त्याला मोकळा होता. पहिला नीतीचा मार्ग! तो काय मार्ग म्हणायचा? त्या मार्गानं त्याची मानसिक उन्नति होण्याऐवजीं जिवाच्या पाठोपाठ त्याचं मनही उडून गेलं असतं. यशवंती घोरपडीला ठार मारून तान्हा-जीला सांगितलं असतं कीं चढ आतां वर. तर त्याला चढणं शक्य झालं असतं काय? मूर्तिकारापुढं नुसता दगड आणून ठेवला आणि एकही हत्यार न

देतां सांगितलं कीं कर एक उत्कृष्ट मूर्ती तयार. तर त्या बिचाऱ्यानं काय करावं ?

आपत्तीमुळें मानसिक उन्नति केव्हां होते ? तर आपत्ती यथाकालीं, यथाप्रमाण आल्या तर.

त्या वृद्ध बाईनीं विपत्तिकाळीं धैर्य सोडलें नाहीं. मी म्हणतें काय कौतुक आहे त्यांत ? चौदाव्या पंधराव्या वर्षापासून ( त्यापूर्वीचें बाल्यही सुखांतच गेलेलें ) योग्य वेळीं पतिपुत्रपौत्रसौख्य मनमुराद उपभोगलेलें. बारीकसारीक सांसारिक अडचणींनीं, परस्परांचा जिव्हाळा वाढवून त्या सुखांत भरच घातली असेल. सुस्थितींतल्या लोकांना लाभणारा सामाजिक गौरव त्यांच्या वांट्यांत होताच. वृद्ध वयांत पंचावन्नाव्या वर्षी त्या बाईचा पती वारला आणि पुढें चार वर्षांनीं मुलगा वारला. या दोन्ही भयंकर आपत्ती खऱ्याच. पण खरं पाहतां इतकीं वर्षे सुख भोगल्यानंतर त्या आल्या होत्या दुसरीं मुलें, नातवंडें आणखी सुख द्यायला आहेतच. खायलाप्यायलाही भरपूर आहे. शिवाय लोकांची सहानुभूति !

आजारपणीं सेवाशुश्रूषेला खूप प्रेमाची मंडळीं असली म्हणजे तो आजार सुसह्य तर होतोच आणि खरोखरीं एकप्रकारें सुखदायकच होत असतो. त्याचप्रमाणें इतरांच्या कौतुकामुळें आणि सहानुभूतीमुळें हीं भयंकर दुःखेंही कितीतरी सुखद होत असतात.

आपत्तीमुळें मनुष्य जोंवर अगतिक होत नाहीं, तोंवर त्याची मानसिक उन्नति सहजशक्य असते. पुढील सुखाला तशी उन्नति मुळीं इष्टच असते. त्या बाईच्या बाबतींतच पहा. पतिनिधनानंतर घरांतल्या घरांत दुःखानं भिजत कुजत पडायचं, कीं समाजसेवा करून दुःख विसरायचं आणि पतीऐवजीं समाजसेवा हें सुखस्थान बनवायचं या दोन मार्गांपैकीं समाजसेवेचा मार्ग ( किंवा कांहींच्या बाबतींत देवपूजेचा ) कितीतरी अधिक सुकर आहे. पण मौज ही कीं, या आपत्तींतून सन्मार्ग शोधल्याबद्दल आपण या लोकांचें कौतुक करतों, परंतु वाटमारी करणाऱ्या गुन्हेगारानें मात्र असन्मार्ग धरला

म्हणून आपण त्याच्याकडे तिरस्कारानें पहातों. आपण त्याच्या परिस्थितीचा विचारच करीत नाहीं. मग सहानुभूति कुठली !

मुळांतच गुन्हेगार वृत्ति असणाऱ्यांची गोष्ट सोडून द्या. पण दुसरे जे बहुसंख्य लोक आहेत, ज्यांची प्रवृत्ति साहजिकपणें गुन्ह्याकडे नसते त्या प्रत्येकाला वाटते कीं, आपण सुस्थितींत असावें आणि सन्मार्गानें वागून चांगुलपणा मिळवावा. यांपैकीं कांहींच्या मनांत मोठमोठाल्या सुंदर सुंदर महत्त्वाकांक्षा स्फुरत असतात. कीर्ति आणि सामाजिक गौरव मिळविण्यासाठीं अविश्रात राबण्याची त्यांची तयारी असते. पण फारच थोड्या लोकांचे मनोरथ पूर्ण होतात. उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः । याच सदरांत दुर्दैवानें बहुतेक जाऊन पडतात. कांहीं लोक सुदैवानें मोठ्या पदावर चढून जातात.

आणि कांहीं लोक निव्वळ सुखोपभोग घेण्यांत रमलेले असतात. आयुष्यांतील बहुतेक भाग हे सुख भोगण्यांतच समाधान मानून रहातात. या पलीकडे जणुं यांना कांहीं कर्तव्य नसतेंच. आणि यांना जसें वाटतें तसेंच आपणालाहि वाटतें. आपला आपला संसार करीत रहाणें येवढेंच काय तें त्यांचें कर्तव्य असें त्यांना वाटतें नि आपणालाही वाटतें. ते सामाजिक नीतिमत्ता झुगारून चोरी खून करीत नाहींत याबद्दल आपल्याला कौतुक वाटतें.

आणि गुन्हेगाराबद्दल सर्वांना तिरस्कार वाटतो. त्याचा तिरस्कार करणं हेंच आपलं कर्तव्य असं सर्वांना वाटतं. पण याचा कुणी विचारच करीत नाहीं कीं, तो सुखासुखी गुन्हेगार झाला का ?

चंदनाचा सुवास ज्वलनाच्या आपत्तीमुळें दरवळतो. अगदीं खरं. पण मोजके निखारे घातले तर ! एकदम मोठ्या भट्टींत चंदन घातलें तर क्षणांत जळून त्याचा कोळसा होईल आणि आलीच तर जळकी घाण येईल. ही काय चंदनाची चूक ? एवढ्या आगींत चंदन टाकणाऱ्याची चूक आहे ती. उकिरड्यावर गुलाबपाणी टाकलं तर तो सुवासिक बनेल कां ? आणि त्याचा थोडाबहुत भाग सुवासिक बनला तरी तेथें जाऊन नाक खालीं करून तो सुगंध कोण हुंगील ? आणि कोण त्या सुगंधाचें कौतुक करील ? हा काय

त्या गुलाबपाण्याचा दोष ? उकिरड्यावर गुलाबपाणी टाकणाऱ्याचा दोष आहे तो.

कारागिरांजवळ उत्तम दगड आणून दिले आणि त्यांना सुंदर मूर्ती घडवायला सांगितल्या. भरपूर वेतन कबूल केलें आणि योग्य तीं उत्तम हत्यारेंही दिलीं.

आणि असें असून कुशलतापरिश्रमानें त्या दगडांच्या सुंदर मूर्ती बनण्याऐवजीं सर्व दगडांची नासधूस झाली तर तो दोष कुणाचा ? त्या दगडांचा ?

सुखसंपन्न सुस्थितींत असलेले लोक हे सर्व हत्यारांनीं युक्त अशा कारागिरांप्रमाणें आहेत. कांहीं लोक विपत्तींमुळें गांजून गेल्यामुळें, अगदी अगतिक झाल्यामुळें गुन्हेगार बनतात, निराकार दगड बनतात हा या लोकांचा दोष आहे.

त्या वृद्ध बाई पतिपुत्रनिधनांच्या आपत्तींत डुंबून न रहातां समाजसेवा करूं लागल्या ही गोष्ट समाधानाची खरी. परंतु आधीं सुखोपभोग घेत असतां त्यांना समाजसेवा सुचली नाहीं, ही त्यांची चूक झाली. त्या चुकीबद्दल प्रथम त्यांचा तिरस्कार करून नंतर त्यांनीं ती चूक केव्हां तरी कां होईना पण सुधारली म्हणून समाधानाचा सुस्कारा टाकायला हवा.

तो आरोपी गुन्हेगार झाला हा त्याचा दोष नव्हे. गुन्हा करण्याची प्रवृत्ति होईल अशा विपत्तींत कुणाही मनुष्याला ठेवणं, केवळ स्वार्थपरायण राहून या गोष्टीकडे दुर्लक्ष करणं, आणि पुन्हां आम्ही नैतिक आचरणानें वागणारे म्हणून एकमेकांनीं परस्परगौरव करणं या प्रवृत्तींचा दोष आहे तो. समाजशास्त्रांत ढोबळ चुका ठेवणाऱ्यांचा अपराध आहे तो. इतके असून पुन्हां, हे समाजसेवा सहज शक्य असून मजा मारणारे लोक गुन्हेगारांना नांवे ठेवायला तयारच. नुसती सहानुभूतिसुद्धां देण्याला कुणी तयार नाहीं !

विपत्तींमुळें अगतिक झालेला मनुष्य म्हणजे दगडाप्रमाणें असतो. त्याच्यापेक्षां सुस्थितींत असलेले समाजांतील लोक कारागिराच्या दर्जाचे समजले पाहिजेत. या कारागिरांनीं आपलें कौशल्य खर्चून त्यांच्या चांगल्या मूर्ती घडवल्या

पाहिजेत. दगडाच्या गुणाप्रमाणें मूर्ती बरीवाईट बनेल हें सयुक्तिकच आहे. पण प्रयत्नांत कसूर होतां कामा नये. ज्यांच्याकडून प्रयत्नांत कसूर होईल तेंच खरे गुन्हेगार.

आपलें बहुतेक आयुष्य सुखोपभोगांत व्यर्थ घालविणारी ती वृद्ध समाज-सेविका आणि तिच्यासारखेच इतर लोक, हेच गुन्हेगारीला अप्रत्यक्ष रीतीनें प्रोत्साहन देणारे आणि म्हणूनच गुन्हेगार होत, निंद्य होत.

आणि तो वाटमाऱ्या बिचारा ! चांगला कारागीर न भेटल्यामुळें, निरु-पयोगी म्हणून रस्त्यांत पडला, कुणाला तरी ठेंच लागण्याला कारणीभूत झाला ! कुणाला पुन्हा त्याचा संपर्कही होणार नाहीं अशा जागीं त्याला फेंकून दिला. उत्कृष्ट मूर्ती घडावी असे गुण असतीलही कदाचित् त्याच्यांत. पण आतां काय त्याचें ? त्या दगडाबरोबर ते गूणहि धुळीला मिळाले ! बिचारे ते गुण !

---

## उत्तिष्ठत, जाग्रत ! : : ११

परदेशीय महिलाच्या कर्तबगारीच्या हकिगती वाचतांना किती अद्भुत-रम्य वाटतात !

इंग्लंडमधली एमी मॉलिसन हिचीं विमानोड्डाणें, आणि तिनें केलेले विक्रम ! ही एकच काय पण अशा कितीतरी वैमानिक महिला आज एकट्या इंग्लंड-मध्यें आहेत.

कांहीं स्त्रियांनीं स्वतः कारखाने चालवले आहेत, कांहीं अत्युच्च शिक्षण घेऊन कॉलेजांत अध्यापिका आहेत, कांहीं उत्खनन, संशोधन करण्यांत गुंतल्या आहेत तर कांहीं राजकीय व सामाजिक सुधारणांत आयुष्य वेंचीत आहेत !

रशियन, अमेरिकन स्त्रिया अशाच तऱ्हतऱ्हेचे उद्योगधंदे करीत आहेत.

तर चिनी महिला रणांगणावरही येऊन पोंचल्या आहेत.

त्या परकीय महिलांचे पराक्रम वाचतांना असें वाटणें साहजिकच आहे कीं, कुठें इंद्राचा ऐरावत अन् कुठें शामभटाची तट्टाणी !

त्या देशांना स्वातंत्र्य आहे, संपत्ति आहे, हव्या तितक्या सोयी आहेत. मग त्या स्त्रियांनीं पराक्रम केले तर काय मोठें कौतुक ?

हिंदु लोक पारतंत्र्यांत, अज्ञानांत आणि दारिद्र्यांत खितपत पडलेले. आणि स्त्रिया तर काय, पायदळीं पडलेल्या. गुलामांच्या गुलाम. मग आम्हीं त्या स्त्रियांची बरोबरी करणार तरी कशा ? आम्हीं आपले अरेबियननाईटसारखे त्या महिलांचे पराक्रम वाचावेत झालं !

परंतु याप्रमाणें निराश होऊन पायदळीं रहाण्यांतच समाधान मानणें म्हणजे खरोखरी आत्मघातकीपणाचें आहे. अज्ञान आणि आळस यांच्या चिखलांत डुंबूनडुंबून त्याचीच गोडी वाटत असल्याचें लक्षण आहे तें.

आज परदेशीय महिला ज्या इतक्या पुरुषांच्या बरोबरीनें सर्व क्षेत्रांत कर्तबगारी दाखवीत आहेत त्या काय सुखासुखी ? पुरुषांनीं आत्मसात् केलेल्या प्रचंड औद्योगिक क्षेत्रांतील प्रत्येक बाबतींत त्या चढाओढीला सरसावलेल्या असून त्या यशस्वी होऊन दाखवताहेत तें काय सहजासहजीं ?

अगदीं मुळींच नाहीं. शंभर वर्षांपूर्वी हिंदी स्त्रियांइतक्याच पाश्चात्य स्त्रियाही अज्ञान आणि पारतंत्र्य या चिखलांत खितपत पडलेल्या होत्या. आणि अगदीं परवां परवांपर्यंत स्त्रीदास्यविमोचनासाठीं त्या झगडत होत्या.

इंग्लंड देश हा अत्यंत रूढिप्रिय आहे. तेथील लोक प्रथम स्त्री-शिक्षणाला व एकंदरींत स्त्रीस्वातंत्र्याला फार विरुद्ध होते. इंग्लिश स्त्रियांचें मुख्य ध्येय विवाह हेंच असून, गृह हेंच त्यांचें कार्यक्षेत्र होतें. पूर्वीं हिंदु स्त्रियांना ज्याप्रमाणें वेदशास्त्रें शिकवण्यास प्रतिबंध होता, त्याप्रमाणेंच इंग्लंडमध्येंही स्त्रियांना शिक्षणाचें व शास्त्रांचें वावडें होतें. लॅटिनसारखी परकी भाषासुद्धां त्यांना शिकूं देत नसत.

अशा या इंग्लंड देशांतील स्त्रियांनीं अतुलनीय धडाडी दाखवली. थोडी-थोडकीं नव्हे तर शंभर वर्षें त्या स्वातंत्र्यासाठीं लढत होत्या.

ज्या क्वीनस् कॉलेजनें स्त्रीशिक्षणाची प्रथम थोडीबहुत सोय लावली त्याला अजून शंभर वर्षें व्हावयाचीं आहेत.

सन १८६८ मध्यें एका मुलीला मॅट्रिकच्या परीक्षेला बसण्याला परवानगी नाकारण्यांत आली.

आहे ना पण ही गोष्ट आश्चर्यजनक ?

स्वतंत्र देशांतील संपन्न स्त्रिया म्हणून त्यांना कुठें कांहीं सवलती मिळाल्याचें दिसत नाहीं.

पन्नास वर्षांपूर्वीं हिंदी स्त्रियांना शिक्षणासाठीं जशी लोकनिंदा सहन करावी लागली आणि अनेक प्रकारें छळही सोसावा लागला त्याचप्रमाणें इंग्लिश महिलांनाही शिक्षणाची दहीहंडी हस्तगत करतांना महाप्रयास पडले.

शिक्षणाच्या ह्या अंधकारमय भुयारांतून हळूंहळूं मार्ग क्रमीत असतां महायुद्धाच्या वेळीं स्त्रियांना आशेचे किरण दिसूं लागले. देशांतील उद्योगधंदे तगवून धरणें आणि सैन्याला हरएक प्रकारची मदत करणें या बाबतींत इंग्लिश स्त्रियांनीं आश्चर्यकारक कर्तृत्व दाखविलें. मि. चर्चिल म्हणाले कीं, "स्त्रियांच्या कर्तृत्वाचे अभावीं इंग्लंडला विजय मिळणें अशक्य झालें असतें." सर्व इंग्लंड स्त्रीसुधारणेला पूर्ण अनुकूल झालें तें या महायुद्धापासूनच. याप्रमाणें आपल्या राष्ट्रासाठीं भयंकर दिव्य करून दाखवलें तेव्हां इंग्लिश स्त्रियांना मताधिकार मिळाला !

इंग्लिश स्त्रियांनीं केवढ्या काळपर्यंत चिकाटीनें प्रयत्न केले ते पहा ! त्यांची तपस्या किती दीर्घ काळानंतर फळाला आली !

त्या मानानें आपल्याला कांहींतरी त्रास पडला कां ? इंग्लिश स्त्रियांच्या तपस्येची जवळजवळ पाऊणशें वर्षें आपल्या पदरांत फळाच्या रूपानें फुकटची पडलीं आहेत असेंच खरोखरी म्हणावेसें वाटतें.

फुकट कोणतीही गोष्ट लाभली कीं तिची नीटशी किंमत मनुष्याला होत नाहीं. तशीच अवस्था आम्हां हिंदु स्त्रियांची होत आहे.

पाश्चात्य स्त्रियांची उन्नति पाहून हिंदी पुरुषच मुळीं आपल्या स्त्रियांच्या उन्नतिप्रीत्यर्थ खटपट करीत आहेत. बालविवाहनिषेध, पुनर्विवाह, पतिगृहीं वारसाहक्क अशा अनेक सामाजिक सुधारणा पुरुषांनीं स्त्रियांना अर्पण केल्या. स्त्रिया "नको बाई, नको बाई" म्हणत असतां या सुधारणा पुरुषांनीं त्यांच्यावर लादल्या. स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत शिकणाऱ्या स्त्रियांना त्रास झालाच पण पुरुषांनाही अतोनात सामाजिक दूषणें घ्यावीं लागलीं. कारण कांहीं थोडे पुरुष या सुधारक पुरुषांना विरोध करीतच असतात.

इंग्लिश स्त्रियांना पुरुषांच्या विरोधांतून मार्ग काढावयाचा होता. अन् आम्हां हिंदु स्त्रियांच्या डोक्यावर सुधारणांचा पाऊस पडत असतां आम्हीं कोरड्याच.

इंग्लिश स्त्रिया सकारण पुरुषांना शिव्या देत. त्यांचें अनुकरण करून आम्हींही पुरुषांना शिव्या देतों. बाकीच्या चांगल्या बाबतींत त्यांचें अनुकरण करण्याच्या नांवानें पूज्य.

आम्हीं खरोखरीं स्त्रियांनाच शिव्या दिल्या पाहिजेत. स्त्रीसुधारणेच्या आड स्त्रियाच येतात.

स्त्रीशिक्षणाची सोय होऊन पन्नासांच्यावर वर्षे झालीं पण अजून शहरांतून-सुद्धां सुशिक्षित स्त्रिया किती थोड्या आहेत! शहरांतील कोणत्याही समारंभाला पहावें तरी उच्च शिक्षित स्त्रिया हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्याच असतात. बहुतेक भरणा अशिक्षितांचा. आणि या अशिक्षित स्त्रियांचा उद्योग काय तर सुशिक्षित स्त्रियांना कमी लेखून मन मानेल तसें बडबडत असणें, आणि या रीतीनें आपल्या अशिक्षितपणावर पांघरूण घालूं पहाणें.

कां असं? इतक्या वर्षांत अशी वेळ यायला हवी होती कीं, बहुतेक स्त्रिया उच्च शिक्षण घेतलेल्या आणि फक्त वृद्ध स्त्रिया तेवढ्या अशिक्षित.

गेल्या वीस वर्षांत पाश्चात्त्य व पौर्वात्त्य महिला कुठल्या कुठें सुधारणेच्या शिखराकडे धांवत गेल्या. रशिया, अमेरिका, चीन, जपान सगळीकडे स्त्रिया आपल्या राष्ट्राच्या उद्धारासाठीं पुरुषांच्या बरोबरीनें उभ्या आहेत.

आम्हीं हिंदी स्त्रिया मात्र स्वस्थ आहोंत.

मनुष्यजातीला सामाजिक सुस्थिति अत्यावश्यक आहेच. त्याबद्दल सदैव प्रयत्न करीत असणें योग्यच आहे.

परंतु हल्लींचा काळ असा आला आहे कीं, या गोष्टींना नसतें महत्त्व देण्यांत अर्थ नाहीं. प्रत्येक राष्ट्रापुढें जगायचें कीं मरायचें हा प्रश्न येऊन पडलेला आहे. आणि आपला देश जगवून धरण्यासाठीं प्रत्येक पुरुषानेंच नव्हे तर प्रत्येक स्त्रीनेंही तयार झालें पाहिजे.

जगांत आज काय काय घडामोडी चालू आहेत त्या अभ्यासून इतर राष्ट्रांच्या बरोबरीनें आपल्याही देशाचा मान रहावा यासाठीं आटोकाट प्रयत्न करणें हें प्रत्येक स्त्रीचें अत्युच्च ध्येय मानलें पाहिजे. स्त्रीनें नुसतें अष्टपुत्रासौभाग्यवती होण्यांत भूषण नाहीं. पूर्वींचे लोक मुली सुशिक्षित आणि कलावती करून देवाला वहात. आतां मातेनें आपलें प्रत्येक अपत्य शारीरिक आणि बौद्धिक दृष्ट्या उत्कृष्ट सजवून देशाला वाहिलें पाहिजे. अशा प्रकारें मुलांचें संगोपन, शिक्षण करण्याचें पतीला जमलें नाहीं तर स्त्रीनें स्वतः धंदाउद्योग करून मुलांचें यथायोग्य पालनपोषण केलें पाहिजे. हीच आदर्श माता.

कुटुंबसंस्था बिघडेल ? बिघडू दे कीं जरा. सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः !

स्त्रियांनीं मदत केली म्हणूनच इंग्लंड देश महायुद्धांत तगून राह्यला ना ? आपल्याही दुर्बल राष्ट्राला पंधरा कोटी पुरुषांच्या बरोबरीनें पंधरा कोटी स्त्रियांच्या मदतीची अपेक्षा आहे.

स्त्री असो कीं पुरुष असो, ज्याच्या म्हणून अंगांत कांहीं कर्तबगारी आहे, त्यानें ती राष्ट्रहितासाठीं उपयोजिलीच पाहिजे. आजकाल इतरांच्याप्रमाणें हाच राष्ट्रधारणाचा धर्म आपण आचरला पाहिजे.

हें तत्त्व शिकण्यासाठीं इंग्लंड, जपान या परकी राष्ट्रांकडे तरी आपल्याला पहाण्याची काय जरूर ?

आपलेंच रामायण, भारत, भागवत वाचून पहा. कैकेयी रणांगणावर पतिसमवेत गेली होती, व तिनें रथाचा आस मोडला असतांना, चाकांत हात घालून रथ सांवरून धरला आणि पतीला विजय मिळवून दिला.

द्रौपदीनें अज्ञातवासांत असतां सैरंध्रीचें काम केलें.

त्या पौराणिक स्त्रियांच्या डोहाळ्यांचें नीट मनन तरी करून पहा. राष्ट्रोद्धारक पुत्रासाठीं जीव तळमळेल तीच आदर्श स्त्री नव्हे काय ?

पूर्वींच्या कथा वाचून आतां आपण हंसतों. आपल्याला वाटतें " कोण हा रानवटपणा. लग्नासारखी गोड गोड बाब आणि तिच्यासाठीं स्वयंवर मंडपांतले ते पण नी लढाया ! पूर्वींचीं तीं क्रोधागारं, नि ते केस मोकळे सोडून दागिने काढून हट्ट धरणं. इश्श ग बाई ! "

पण त्यावेळीं माहीत असलेल्या जगतितलावर त्या रानवटांनींच राज्य केलें. हिंदुस्थान ही त्यावेळीं सुवर्णभूमि होती व स्वातंत्र्यभूमीही होती.

आतां ती पारतंत्र्यांत लोळणाऱ्या गुलामांची भूमि बनली आहे. त्या पुराणकालीन वीर स्त्रियांना हंसण्याचा आम्हांला काय अधिकार ? पूर्वींचे विवाह म्हणजे पुरुषांना पराक्रम दर्शवण्याची सुवर्णसंधि असे. शस्त्रास्त्रविद्या, शौर्य, धैर्य आणि कलाप्रवीणता यांच्या चढाओढीचे सामनेच असत ते. अशा त्या विजयी वीरपुरुषाला विवाहाची माळ घालण्यांत त्या वधूला केवढी धन्यता वाटत असेल ! अशा पतीच्या नांवानें मंगळसूत्र बांधण्यांत केवढा मान !

आतांचे विवाह म्हणजे पुरुषांना हुंडा उकळण्याचा सुकाळ. मुली त्यांच्या पायाशीं लोटांगण घालीत जातात. कशी त्यांना बायकांची किंमत वाटावी ?

सुशिक्षित मुलींनीं आतां असे कांहींतरी पण लावूनच विवाह जमवावेत. ज्यानें थोडी तरी राष्ट्रसेवा केली आहे किंवा वेळप्रसंगीं राष्ट्रसेवा करण्याची

ज्याच्या अंगीं धमक आहे अशा पुरुषांशींच विवाह करण्यांत जन्माचें सार्थक आहे. नेभळटाशीं लग्न करण्यांत काय अर्थ ?

पती मेल्यावर स्त्रीचें कुंकू पुसतात ना ? आतां मातृदेशानें हांक मारली असतां जो ती हांक ऐकणार नाहीं, त्याच्या पत्नीनें खुशाल कुंकू पुसून टाकावें, किंवा मंगळसूत्र तोडून टाकावें. पूर्वींच्या क्रोधागारांचें सुधारलेलें स्वरूप असें करावें.

राष्ट्रोद्धारासाठीं जी पतीला प्रोत्साहन देईल तीच आदर्श पत्नी !

कांहीं स्त्रिया नुसत्या पूर्वजांच्या नांवलौकिकावरच तृप्त असतात. "आमच्या या भारतभूमींत सीता, द्रौपदी, सावित्रीसारख्या अलौकिक स्त्रिया झाल्या, आम्ही पूर्वीं असें होतों. जिजाबाई, झांशीची लक्ष्मीबाई याही वीरस्त्रिया आमच्या हिंदुस्थानांतल्याच. शिवबाच्या मराठ्या मावळ्यांचे आम्ही वंशज !"

हो. हो. पण कशाला ही फुशारकी ?

पूर्वजांना हंसण्याचा आम्हांला अधिकार तर नाहींच. पण त्यांचे आम्हीं वंशज म्हणून अभिमान बाळगण्याचें तरी काय प्रयोजन ? काय अधिकार ?

इमर्सननें लिहिलें आहे, " थडग्यांत पुरलेल्या बिचाऱ्या मृतजीवाचें वित्त-हरण कां करतां ? त्याचीं विजयचिन्हें त्याच्याबरोबर पुरलेलीं आहेत त्यांचा लोभ कां धरतां ? तो मृत मनुष्य जिवंत असतांना त्यानें तीं जेथून मिळवलीं तेथून तुम्हीही मिळवून आणा. जा लवकर जा आणि ध्येय गांठा. कारण आयुष्य फार थोडें आहे. "

